# मोटेंवला 'माल'

# एका पोपटाची कहाणी : १

मिस् हसीना दिलवाली हिची कवाली तुम्हीं ऐकली आहे? बाई प्रकाश गाते तिच्या दिवाणखान्यात रोज रात्री गाण्याची बैठक भरते बाईचा गळा तितकासा गोड नाही आवाजात किंचित घरघर आहे गातांना तिला खोकलाहि येतो. हसीनाला बर्फाच गार पाणी फार आवडत बैठकींत किती वेळा पाणी पिईल याचा हिशेब नाही मी तिला हजार वेळा सांगितल की, 'हें वर्फाच पाणी पिऊ नकोस यापेक्षा दुसरें-तिसर पीत जा' पण बाई ऐकत नाही पदराने वारा घेत ती म्हणते, "काय करू लाला? जिवाची आग आग होते"

मी माझ्या खिशात खडीसाखर आणि लवग नेहमी बाळगतो, तिच्यासाठी म्हणून, पण बाईचा आवाज सुधारण्याऐवजी माझा आवाज सुधारला आहे.

मिस् हसीनाजवळ गाण्यापेक्षा नखरा जादा आहे. तिच्या ठसदार हावभावामुळें बैठकीला रग चढतो काव्यातील आशय ओळखून रसानुकूल अभिनय करण्यात ती पटाईत आहे तिचा गळा गात नसला तरी बाकीचे अवयव गात असतात.

आता मुख्य मुद्यांकडे वळतो बाईच्या दिवाणखान्यात खिडकीला पोपटाचा एक पिंजरा टांगलेला आहे. त्या पिंजऱ्यात एक देखणा, डौलदार पोपट आहे तो पोपट एकच वाक्य बोलतो, "हम पछी दुसरे डाल के"

मी एक दिवस हसीनाला विचारले, "तुमचा हा पोपट असं काय बोलतो? या बोलण्याचा अर्थ काय?"

हसीनाचा चेहरा कष्टी झाला तिच्या डोळ्यातील काजळ विरघळले एक सुस्कारा टाकून ती म्हणाली, " ह्या पोपटाचा एक फार मोठा किस्सा आहे. तो इतिहास मी तुम्हाला रात्री सांगेन निवांत वेळी बैठक संपल्यावर तुम्ही बसून रहा "

पोपटाला पेरूची फोड देऊन तिने त्याला लडिवाळपणे कुरवाळले पोपट पंख फडफडावीत चीत्कार करू लागला, " हम पछी दुसरे डाल के "

माझे कुतूहल जास्तच वाढले पोपटाचे रहस्य जाणून घेण्याची इच्छा तीव्र झाली.

रात्री बारा वाजता हसीनाचा जलसा संपला पाहुणेमंडळी निघून गेली मी दिवाणखान्यात बसून राहिलो पोपटाचा इतिहास मला ऐकावयाचा होता

हसीना पानाला चुना लावीत माझ्या शेजारी येऊन बसली ती आज बरीच थकलेली दिसली कधी कधी दर्दभरी गीते गायल्यानंतर तिच्या भावनाशील मनावर असाच परिणाम होतो संगीत संपले तरी तिच्या अंतःकरणाच्या वेदना संपत नाहीत

मी म्हटले, " दिलवाली तुम्ही अगोदर काही खाऊन घ्या तेवढीच हुशारी वाटेल मी थांबतो आणखी जरा घरी जायला थोडा उशीर होईल खरा, पण पोपटाचा किस्सा जास्त महत्वाचा आहे चला, जा, खाऊन या पाहू अगोदर "

पण हसीना उठली नाही क्षीण हास्य करीत ती म्हणाली, " नाही आज भूक नाही मला या पोपटाने पेरू खाल्ला, माझे पोट भरले पण तुम्ही काहीतरी घ्याच "

" छे छे ! माफ करा मला काही नको तुमचे पोट भरले, तर माझेहि भरले, "

इतक्यात बंदाअल्ली त्या ठिकाणी आला अंडी विकण्याचा धंदा करतो, म्हणून त्याला ' बंदाअल्ली ' हे नाव पडले असे नाही तो मूळचाच बंदाअल्ली. गानसुंदरी हसीनाबाईच्या खास मर्जीतला तो एक भाग्यवान आशक आहे हसीनासाठी पागल झालेले अनेक उमेदवार आणि उल्लू यार

होते एक मिठाईवाला हसीनाच्या भेटीला रोज पेढेबर्फी घेऊन येई एक कापडवाला साडी, ब्लाऊझ, मलमल घेऊन येई पण ह्या तमाम मोहब्बत-वाल्याना दूर सारुन, हसीनानें हा सामान्य वैदाअल्ली कसा काय पसत केला, याचेच लोकाना नवल वाटतें

वैंदाअल्ली हा साधा अडीविक्या खरा, पण तो मोठया हिंमतीचा मर्द गडी ! वाटेल तें धाडस करायला तो डरत नाहीं. जिवाची फिकीर करीत नाहीं. हसीनासाठी वाटेल ती कुर्बानी करायला तो सदैव तयार असतो. खुबसूरत हसीनावर त्याचा प्यार जडला आणि हसीनाहि त्यांच्या गुणावर भाळली, फिदा झाली

वैंदाअल्लीची आणि माझी ओळख हसीनाच्या घरी झाली पुढें पुढे त्याची नि माझी चागलीच दोस्ती जमली. दोस्ती जमण्याचे कारण, माझे साहित्य तो वाचीत नाही आणि त्याची अडी मी खात नाही.

वैंदाअल्ली एका पायाने लगडा आहे हल्लीच त्याचा पाय निकामी झाला सयुक्त महाराष्ट्राच्या आदोलनात भयकर गोळीबार झाला, त्यावेळी एका माणसाच्या मदतीला तो धावून गेला होता रक्तबंबाळ अवस्थेत रस्त्यात तडफडणाऱ्या एका जखमी जीवाला पाणी पाजण्यासाठी तो धावून गेला होता, पण त्या धामधुमीत वैंदाअल्लीला गोळी लागून त्याचा डावा पाय कायमचा जायबदी झाला

हसीना मला पोपटाची गोष्ट सागणार होती, पण हा वैंदाअल्ली मध्येच आल्यामुळे, घोटाळा झाला. कारण, आल्याबरोबर माझ्या पाठीवर हात मारुन तो म्हणाला, " वा ! दोस्त ! तुम्ही आहात का अजून इकडे ? छान कपनी ! थोडी घेता का ? ' असे म्हणून त्याने खिशातून बाटली काढली

पोपटावरुन माझें लक्ष बाटलीकडे वळले मी इकडे तिकडे पहात हळूच म्हटले, " अहो वैंदाअल्ली, अगोदर दार तरी लावून घ्या ! "

" तुम्हीं गिरगावचे लोक भारीच घाबरट मी भर रस्त्यातून माल घेऊन आलो, पण तुम्हाला खोलीतल्या खोलींत भीति वाटते "

हसीनाने दरवाजा लावून घेतला आणि काचेचे दोन पेले तिने

आमच्या पुढयात ठेवले. हातभट्टीच्या उग्र दर्पाने खोली दरवळून गेली. वास बाहेर जाऊं नये म्हणून हसीना धूप जाळू लागली.

वेंदाअल्ली खूप होऊन म्हणाला, " आज माल चांगला मिळाला राव. नाहीतर कधी कधी नवसागर फार असतो."

" दारूमध्यें दोष काढू नये वेंदाभाई ! आज दिवस काय आहेत ! जे काही मिळेल तें गोड मानून घेतलें पाहिजे "

आम्हा दोघानाहि थोडीथोडी चढू लागली. वेंदाअल्ली एकदम आठवल्यासारखें करून म्हणाला, "काय हो छापावाले, पचवार्षिक योजना यशस्वी करण्यासाठीं पंडित नेहरू दारूबंदी रद्द करणार आहेत म्हणून ऐकतो, खरं का ? "

पिवळा हत्तीचे पाकीट काढून मी म्हणालो, " तशी सूचना करायला हरकत नाही. पुढील पिढीच्या कल्याणासाठीं चालू पिढीने थोडी घेतली म्हणून काय बिघडले ?"

" मीहि तेंच म्हणतो " वेंदाअल्ली आवेशानें म्हणाला, " आत्ताच पहा, मी ह्या बाटलीसाठी दहा रुपये खर्च केले मवाल्याचा फायदा झाला हे पैसे सरकारला मिळाले नसते का ?"

आमची ही चर्चा हसीनाला आवडली नाही आपल्या नाजुक गोऱ्यापान हातानीं पानाचा विडा करीत ती बसली होती. कबुतराप्रमाणे मान मुरडून तिने आदेश दिला, " मेहेरबान मडळी, कृपा करून ह्या दिवाणखान्यात राजकारणावर चर्चा करू नका. ह्या ठिकाणी सर्व पक्षाचे लोक येत असतात. इथे तुमचे राजकरण नको

' हम पंछी दुसरे डाल के ! ' पोपटाच्या पिंजऱ्यातून खणखणीत आवाज आला. मी एकदम शुद्धीवर आलो. ज्या कामासाठी मी बसलों होतों तें कामच विसरून गेलो होतों.

दिलगिरीच्या स्वरात मी म्हणालो, " हसीनाबाई, माफ करा. या वेंदाअल्लीच्या कार्यक्रमामुळें मुख्य मुद्दाच मी विसरून गेलो. तुम्ही मला पोपटाची गोष्ट सांगणार आहात ना ?"

वेंदाअल्ली हसून म्हणाला, " तुम्ही काय बच्चे आहात तोता–मैनेच्या

गोष्टी ऐकायला ?"

हसीना गोष्ट सागू लागली, "ऐका लाल, माझ्या पोपटाचा किस्सा! वाळकेश्वराच्या बगल्यात एक श्रीमत सावकार रहात होता तो सावकार कधी कधी माझ्या दिवाणखान्यात पायधूळ झाडून जात असे त्या सावकाराला दोन बायका होत्या दोन बायकाबदीचा कायदा होण्यापूर्वी ही लग्नें झालेली होती दोन बायकापैकीं एकीचं नाव वारू आणि दुसरीचं नाव सारू वारू आणि सारूच एकमेकीशी पटत नसे सवती–सवतीमध्यें भाडणतटे होत असत वारूला रमण नावाचा एक सात–आठ वर्षांचा मुलगा होता सारूला छगन आणि मगन असे दोन मुलगे होते छगन नऊ वर्षांचा मगन अकरा वर्षांचा वारूपेक्षा सारू जास्त देखणी, शिवाय दुसरेपणाची, म्हणून सावकाराची ती फार आवडती झाली होती सावकार तिचे आणि तिच्या मुलाचे विशेष लाड करी पतीच्या लाडान सारूबाई शेफारून गेली होती घरात सारूबाईचेच वर्चस्व असे ती आपल्या सवतीचा आणि तिच्या मुलाचा छळ करी बिचारी वारूबाई अश्रू ढाळीत अगतिकपणे जीवन जगत होती

सवतीच्या छळाने आणि पतीच्या उपेक्षेने वारूबाई खगत चालली होती आजारीपणात तिचे उपचार कोण करणार! एक दिवस वारूबाई मरण पावली तिचा बाळ रमण उघड्यावर पडला रमणने टाहो फोडला मातेच्या मृत्यूने त्याच्या जीवनाचा एकमेव आधार तुटला बाप असून नसल्यासारखा आणि सावत्र आई तर हातात विस्तव घेऊन डागण्या देण्यास तयार!

वारूबाईच्या मृत्यूमुळे सारूबाईला रान मोकळें झालें ती सवतीच्या पोराचा खूप छळ करू लागली त्याला मारहाण करू लागली श्रीमत सावकाराचा मुलगा असूनहि स्वत:च्या घरात शिळ्या भाकरीच्या तुकड्यालाहि तो महाग झाला

दिवाळी आली सारूबाईचे दोन मुलगे छगन आणि मगन उची कपडे घालून मिठाई खात होते मातृहीन रमण दूर चुरमुरे खात बसला होता छगन हळूच उठून रमणकडे गेला आणि म्हणाला, "तू का मिठाई खात नाहीस? आज दिवाळी ना!"

रमण लाचारपणे हसून म्हणाला " दादा, तुमची गोष्ट वेगळी, माझी वेगळी. मला कोण देणार मिठाई ? हम पछी दुसरे डाल के !"

सायंकाळीं छगन आणि मगन फटाके उडवू लागले. रमण दुरून मौज बघत होता. मगननें विचारलें, " रमणभाई, तू का नाहीं फटाके वाजवीत ?"

रमण उत्तरला, " मला कसली आली आहे दिवाळी ! कोण मला फटाके आणून देणार ? हम पंछी दुसरे डाल के."

" रमणभाई, तू फाटके कपडे का घालतोस ? आमच्याप्रमाणें सुंदर पोषाख का करीत नाहीस ?"

" रमणभाई, आई आम्हाला घेऊन सिनेमाला जाते, तुला का नेत नाहीं ती ?"

" रमणभाई, तुझ्याबरोबर खेळायला आई आम्हाला देत नाहीं. कां रे असं ? आपण भाऊ भाऊ ना ?"

प्रश्न हजार, पण उत्तर एक, " हम पछी दुसरे डालके."

पण काही झालें तरी रमण हा सावकाराचा बेटा. उद्या बापाच्या इस्टेटीचा वाटा पटकावणार ! या गोष्टीचा सारुबाई गंभीर विचार करू लागली. हा काटा काढावा याचाच घोर तिला आता लागला.

सारुबाईच्या घरीं मोटार होती मोटार ड्रायव्हर एक नंबरचा मवाली आणि गुंड माणूस शेठजींचा व्यवहार काळ्या बाजाराचा असल्यामुळें त्यांनी ड्रायव्हरहि तसाच सुरेबाज पाहून बाळगला होता त्या मोटार ड्रायव्हरचे नांव वैदाअल्ली "

" काय ? वैदाअल्ली ? हा आपला वैदाअल्ली तर नाही तो ?" विस्मय करीत मी सवाल केला

" मध्यें बोलूं नका !" हसीना दरडावून म्हणाली, " किस्सा सगळा ऐकून घ्या. काय म्हणत होतें मी ? हो, त्या मोटार ड्रायव्हरचे नाव वैदाअल्ली असाच होता दिसायला. असेच कुरळे केस, असाच डोळ्यात सुरमा, कानांत अत्तराचा फाया, आणि गळ्यात लपेटलेला हिरवा रमालहि असाच. फार कशाला, हाच म्हणाना तो वैदाअल्ली !

" सारुबाईनें वैदाअल्लीला विश्वासात घेतला. वैदाअल्लीला चार हजार

रुपये दिले आणि सवतीच्या पोराचा खून करण्याचा मानमंत्र दिला.

एक दिवस रात्री बारा वाजता अचानक वैदाअल्ली माझ्या दारात येऊन उभा राहिला त्याच्याबरोबर आठ वर्षांचा एक कोवळा मुलगा होता. मुलाच्या हातांत पोपटाचा एक पिंजरा होता घरात शिरताक्षणींच त्या पोपटानें ललकारी ठोकली 'हम पछी दुसरे डाल के!'

मी पाहातच राहिले हा काय मामला आहे तेच मला कळेना

वैदाअल्लीची आणि माझी त्यावेळीं आजच्यासारखी दोस्ती नव्हती वाळकेश्वरच्या शेठजींचा ड्रायव्हर एवढीच मला त्याची माहिती शेठजी माझं गाणं ऐकण्यासाठीं मोटारीतून येत, तेव्हा ड्रायव्हर दारात मोटार उभी करून रस्त्यात पानवाल्याशीं गप्पा मारीत असायचा जिना चढून तो वर कधीच आला नाही

पण आज अपरात्री हा एकटाच एक छोकरा बरोबर घेऊन माझ्या घरीं आला, हे पाहून मी बुचकळ्यात पडले

वैदाअल्ली मला म्हणाला, "हसीनाबाई, ह्या पोराचं रक्षण करा ह्याचा जीव धोक्यात आहे ह्याला आई नाहीं कोणी नाही तुम्हीच त्याची आई व्हा"

वैदाअल्लीने त्या मुलाची सगळी कहाणी मला सांगितली आपण डोळ्यानीं प्रत्यक्ष त्या पोराचे काय काय हाल पाहिले, त्याची आई सवतीच्या छळाने कशी मेली, हा सारा इतिहास त्याने निवेदन केला नंतर डोळ्यात पाणी आणून तो म्हणाला "काय! चार हजार रुपयासाठीं ह्या पोरक्या पोराचा प्राण घेऊ? लाख रुपये दिले तरी हे पाप माझ्या हातून होणार नाही किती गोड, निष्पाप, निराधार बच्चा आहे! खून करतो असं सांगून हिकमतीनं पोराला घराबाहेर काढला हसीना, आपण या बाळाचं रक्षण केलंच पाहिजे"

माझ्या काळजाचं पाणी पाणी झालं मी त्या पोराला कडकडून मिठी मारली पोरानंहि मला विळखा घालून हबरडा फोडला, 'आई!'

पिंजऱ्यातला पोपटहि आक्रदू लागला "हम पछी दुसरे डाल के"

वैदाअल्ली म्हणाला, "हा पोपट ह्या पोराचाच आहे ह्याच्या आईने

पाळला होता तो. ह्या मुलाचं ऐकून ऐकून पोपटहि तीच भाषा शिकला आहे. घरीं हा मुलगा आपल्या भावंडाना नेहमी सागत असतो, 'हम पछी दुसरे डाल के.' पोपटानें पाठ केले आहे तें।"

"त्या रात्री तो मुलगा माझ्याच घरीं राहिला दुसऱ्या दिवशी आम्ही बाळकेश्वराच्या सावकराला बोलावून घेतलं आणि त्याची चागली कानउघाडणी केली. मुलाची हालत ऐकून सावकाराला धक्काच बसला सारूबाईच्या मत्सरी स्वभावाची मजल एवढ्या थरापर्यंत जाईल ह्याची त्याला कल्पना नव्हती बाळ रमणवरील प्राणसकट टळल्याबद्दल त्याने बंदाअल्लीचे आभार मानले आणि मुलाला घरापासून दूर अशा सुरक्षित ठिकाणी ठेवण्याचा बंदोबस्त केला.

"तो मुलगा इथून गेला तरी त्याचा पोपट मी ठेवून घेतला आहे. पोपटाला भेटण्यासाठी तो मधून मधून इथें येतो मला 'आई' म्हणून हाक मारतो, पोपटाला पेरू देतो, माझ्या हातचा खाऊ खातो आणि निघून जातो."

पोपटाचा किस्सा सपला आणि हसीनाचा उत्साहहि सपला. बर्फाचं गार पाणी पीत ती म्हणाली, "त्या गोष्टी आठवल्या म्हणजे जिवाची आग आग होते"

डोळे मिटून हताशपणे ती कोचावर कलडली.

तिला पख्याने वारा घालीत बंदाअल्ली म्हणाला, "रोज हिला असा वारा घालावा लागतो फार जाळून घेते स्वत ला विलक्षण भावनाशील बाई आहे ही. त्या पोराला आणि पोपटाला मी घेऊन आलो, पण हिच्या प्रेमांच्या पिंजऱ्यात 'स्वतः पोपट होऊन अडकून पडलों. त्या दिवसापासून हिची माझ्यावर मोहब्बत जडली. इष्काचा जमाना सुरू झाला"

"पण सारूबाई तुम्हाला नतर भेटल्या की नाही ?" मी प्रश्न केला.

"छे! मी सावकाराची नोकरीच सोडून दिली, नको ती हरामी नोकरी!"

बंदाअल्ली क्षणभर थांबला. नंतर आपल्या अपग पायाकडे पाहून म्हणाला, "काय तकदीर पहा! दुसरी नोकरी पहाण्याची मी खटपट करीत होतों, पण तुमच्या महाराष्ट्राच्या धामधुमींत गोळी लागून माझा एक पाय

बेकार झाला कोण नोकरी देणार लगड्या माणसाला ! बेदा विकून गुजराण करायची पाळी आली, पण मला दु ख नाही राव लगडा झालो ह्याची खत नाहीं अहो, एकशेपाच लोक गोळीबारात ठार झाले, तिथें माझ्या एका पायाच काय ! पण मला साग साल्या, हिंदुस्थानात तेरा प्राताना भाषिक राज्यें मिळाली, मग महाराष्ट्रालाच का मिळू नये ? हिंदुस्थानच्या राजकारणात महाराष्ट्राला सवतीच्या मुलाप्रमाणे का वागविण्यात येते ?"

पिंजऱ्यातल्या पोपटाकडे वळून बेदाअल्लीने सवाल केला

"राजा, तू तरी साग, हें अस.का ? इतर भाषिकाना एक कायदा आणि महाराष्ट्रालाच तेवढा दुसरा कायदा का ? हा पक्षपात ना ?"

पखाची फडफड करीत पोपट किंचाळला

'हम पछी दुसरे डाल के !'

□□□

# बिघडलेली मुलें

माझे नाव विनायक वय वर्षे बारा घरातून पळून आलो आहे आता कसची शाळा नि कसचा अभ्यास ! घर सोडले, शाळा सोडली, आता मुंबईच्या रस्त्यात भटकतो आहे मी लहान मुलगा घराबाहेर पडून करणार काय ? पण मला असा राग आला आहे घरच्या मंडळींचा ! माझी आई जिवंत असती तर माझी ही दशा झाली नसती पण दोन वर्षांपूर्वी आई देवाघरीं गेली आणि बाबानी दुसरी बाई घरात आणली ती माझा फारच छळ करू लागली मला उपाशी ठेवू लागली माझीं अभ्यासाची पुस्तके फाडू लागली मला जगणे अशक्य झाले माझे हाल मी कुणाला सांगू ? बाबा तर तिच्याच आज्ञेत वागणारे शेवटीं कंटाळून घरातून पळून निघालो दोन दिवस झाले घर सोडून रस्त्यात भटकतो आहे दिवसा इकडे तिकडे हिंडतो, रात्रीं फूटपाथवर झोपतो पोटात अन्न नाही अंगावरचे कपडे धुळीनें माखले आहेत आताच समुद्रावर जाऊन आंघोळ केली हो ! स्वच्छता राखली पाहिजे ! शाळेंत मास्तर नेहमी सांगतात की, मुलानी स्वच्छता पाळली पाहिजे; म्हणून समुद्रावर जाऊन आंघोळ केली पण खाणार काय ! भूक फार लागली आहे कुठेतरी नोकरी शोधली पाहिजे पण मला भीति वाटते, मी बिघडणार तर नाही ? घरदार नसलेलीं बेवारशीं मुले बिघडून जातात असं मी ऐकलं आहे या मुंबई शहरात अशी काही वाईट मुले मी पाहिली आहेत चोऱ्या करतात, उनाडक्या करतात, मवालीपणा करतात, विड्या ओढतात, जुगार खेळतात, करू नये ते धंदे करतात, पण मला तसं व्हायचं नाहीं मी चांगला मुलगा आहे शाळेंत मास्तरानी आम्हाला काय उपदेश केला ? मास्तर

म्हणाले, " मुलानो, आपला देश आता स्वतत्र झाला आहे तुम्ही ह्या देशाचे उद्याचे नागरिक आहात चागली विद्या, चागले गुण कमवा आपल्या देशाचे नाव उज्ज्वल करा " गुरुजींचा तो सुदर उपदेश अजून माझ्या लक्षात आहे. पण मला आता भीति वाटते यापुढें मी चागला मुलगा राहू शकेन का ? घरादाराला मुकलेला मी बेवारशी मुलगा ! लहान वय, कोवळे मन अनु, भव नाही, कुणाचा आधार नाही, कुणाच सरक्षण नाही, कुणाची सहानुभूति नाही माझ काय होईल कुणास ठाऊक ! वाईट वळण तर लागणार नाहीं ? मी बिघडून तर जाणार नाही ? मवाली तर बनणार नाही ? परमेश्वरा-तुलाच माझी काळजी !

*        *        *

मला नोकरी मिळाली, पण कुठें ? बारा वर्षाच्या अनाथ मुलाला कसली नोकरी मिळणार ! 'न्यू बलभीम स्वच्छ उपगृहा'त मी पोऱ्या म्हणून राहिलो आहे गिऱ्हाइकाना पाणी ग्लास देतो, कपबशा विसळतो, टेबलाची साफसफाई करतो खाऊन पिऊन पगार आहे नोकरी कशी का असेना, पण उपासमार टळली रस्त्यात रिकामटेकडा भटकून मी बिघडून जाईन कीं काय, अशी जी धास्ती वाटत होती ती दूर झाली आता मी कामधद्याला लागलो आहे उद्या मोठा झाल्यावर स्वतत्र भारताचा मी चागला नागरिक होईन राष्ट्राची भावी पिढी आहे मी शाळेंत मास्तरानीं केलेला उपदेश मी विसरणार नाही माझें वर्तन मी चागले ठेवीन पण ह्या हॉटेलातील नोकरीने मी गाधळून गेलो आहे फार गमत आहे इथें गिऱ्हाइ-काचा व रेडिओचा गोगाट, मर्जी, थाळीपीठ वगैरे पदार्थांचा घमघमाट, ऑर्डरवाल्याचा कलकलाट आणि त्यातच मालकाची आरडाओरड वेळ मजेत जातो पण एक भानगड आहे इथें. ह्या उपहारगृहात खास फॅमिलीसाठीं म्हणून जी सोय आहे ती मला पसत नाही अहो, काय सागू तुम्हाला ? ह्या 'फॅमिली' रूम्स'मध्यें नाना प्रकारची जोडपीं येतात आणि वाटेल तो चावटपणा करतात कोणीतरी पुरुष कुठल्या तरी बाईला घेऊन येतो आणि, काहीतरी चाळे करतो मी पाणी ग्लास द्यायला आत जातो ना, तेव्हां हे प्रकार पाहून मलां लाजल्यासारखें होतें मी लहान मुलगा ! बारा वर्षांचा अजाण मुलगा ! मोठ्या लोकाचे हे चाळे कसे पाहू ? उघड्या डोळ्यानी हें

कपबशा मात्र आणि थोडे मिटून नोकरी करवत नाही ! काय करणार ! नोकरी आहे ना ? गिऱ्हाइकाला पाणी देण्यासाठी आणि रिकाम्या कपबशा उचलण्यासाठी आत जावें लागतें मी इथें नोकरीला लागून तीन दिवस झाले. पण तीन दिवसात हे असले सतरा प्रकार पाहिले. हॉटेलच्या खोलीत असला फाजीलपणा करायला त्याना लाज कशी वाटत नाही ? चांगले सभ्य लोकसुद्धा हे धंदे करतात म्हणजे काय ? काल दुपारची गमत पहा ना ! एक अपटुडेट जटलमन एका पोरीला घेऊन आत शिरला. त्यानीं आइस्क्रीमची ऑर्डर दिली. थोड्या वेळाने मी आत डोकावून पाहतो तों काय ? तो बाप्या आणि ती बाई एकमेकाना बिलगून बसली होती तो पुरुष आइस्क्रीम चाखण्याऐवजी त्या बाईचे गाल चावीत बसला होता ! तें दृश्य पाहताच मी तेथून पळच काढला. त्या धादलीत माझ्या हातून ग्लास खाली पडून फुटला देखील ! आणि वर मालकाच्या शिव्याहि खाव्या लागल्या मला ! देवा देवा ! ह्या सभ्य मडळींचे हे प्रकार पाहून मी लहान मुलगा बिघडून तर जाणार नाही ? माझ्या कोवळ्या मनावर वाईट संस्कार तर होणार नाहीत ? पाडुरंगा, परमेश्वरा तुलाच रे माझी काळजी ! आणि ह्या हॉटेलात येणाऱ्या वडील मडळीना, सभ्य स्त्री-पुरुषाना माझी हात जोडून प्रार्थना आहे की, मायबाप हो, ह्या अज्ञान बालकाला कृपा करून बिघडवूं नका ! त्याच्यापुढे वाईट आदर्श ठेवू नका ! ह्या निष्पाप लेकरावर दया करा !

* * *

आज माझ्या अंगात थोडा ताप आहे. तरीपण मी खाडा केला नाही. नोकरीवर हजर आहे. कष्ट केले पाहिजेत शाळेत मास्तर म्हणत होते कीं 'मुलांनो, कष्ट करा. कष्ट केल्याशिवाय आपल्या देशाची उन्नति होणार नाही.' मी हल्ली शाळा सोडली असली तरी गुरुजींचा उपदेश माझ्या ध्यानात आहे. म्हणून ताप अंगांत असूनहि मी खाडा केला नाही. पण आज मी थोडा दुःखी आहे. कारण वर्तमानपत्रांत एक बातमी वाचली. आमच्या 'न्यू बलभीम स्वच्छ उपहारगृहा'त वर्तमानपत्रांचे खूप अंक टेबलावर पडलेले असतात सकाळी सहज एक पेपर उचलला; तों मला धक्काच बसला. त्यांत पुढील मजकूर होता—

'चि. विनायक यास — तूं घरांतून निघून गेल्यापासून मी, अतिशय

काळजीत पडलों आहे. तरी जिथें असशील तेथून तावडतोब घरीं ये. राग धरू नकोस, यापुढें तुला कसलाहि त्रास होणार नाही. तुझी वाट पहात आहे.

तुझा
अण्णा '

माझ्या वडिलांनीच ही जाहिरात वर्तमानपत्रात छापली होती हे मी ओळखलें. माझ्या अंतःकरणात क्षणभर कालवाकालव झाली. बाबाची आठवण आली. घराची आठवण झाली. गेल्या आठ दिवसात मी ह्या सगळ्या गोष्टी विसरून गेलो होतों पण आता या वर्तमानपत्रातल्या मजकुरानें पुन्हा तें जग माझ्यासमोर उभें झाले माझें डोळे आसवांनी डबडबले. इतक्यात एका गिऱ्हाइकाने 'पाणी पाणी !' अशी ऑरडर केली. त्याबरोबर गल्ल्याविरच्या टेबलावर तंगडया ताणून बसलेले मालक ओरडले, "बिग्या, गाढवा, गिऱ्हाइकाकडे लक्ष आहे की नाही ? पेपर वाचतोस ? तू काय स्वतःला जंटलमन समजतोस पेपर वाचायला ? जा, आपलं काम कर."

मी लगबगीने पेपर खाली ठेवला डोळे पुसून घेतले आणि कामाला लागलो. दिवसभर डोक्यात विचार सुरू होते घरी परत जावें काय ? की जाऊ नये ? पण मला घरची ओढ आहे कुठे ? कोण मला मायेचे माणूस आहे ? वडील आहेत खरे पण त्यांच्यावर माझा विश्वास नाही. ते त्या बाईच्या तंत्राने वागत असतात. ती महामाया तर माझा छळ करीत असते. अशा त्या घरात कोण परत जाईल ? छे ! नको तें घर ! त्यापेक्षा हें स्वच्छ उपहारगृह बरें ! आणि आता तर मला इथले वातावरण अंगवळणी पडले आहे. फार सुखी आहे मी. हॉटेलच्या जीवनाची मला चटकहि लागली आहे. खावें, प्यावं, सिनेमाला जावं आणि इतर सवंगड्यांबरोबर चकाट्या पिटाव्या. कधीकधी फॅमिली रूमवाल्याकडून बक्षिस मिळते. एकंदरीत चैन आहे. माझा मी स्वतंत्र आहे. कुणाचा धाक नाही. वडील मंडळीची हुकमत नाहीं, शाळेची दगदग नाही. अभ्यासाची कटकट नाही. कपबश्या विसळाव्या, गिऱ्हाइकांना पाणी ग्लास द्यावें, टेबलावरून फडका मारावा आणि मधून-मधून फॅमिली रूममध्यें चोरून पहावें; यापलीकडे कसली जबाबदारी नाही. पण देवा, मी बिघडून तर जाणार नाही ? मला वाईट वळण तर लागणार

नाहीं ? केवढा लहान आहे मी ! या वयात मी बिघडून गेलों तर माझ सबंध आयुष्य बरबाद होईल ना ? परमेश्वरा, तुलाच रे माझी काळजी !

* * *

मला वाटत, मी आता थोडा थोडा बिघडू लागलो आहे बिघडल्या-वाचून उन्नति होत नाही, त्याला मी काय करू ? आज मी हॉटेलची नोकरी सोडली. तीन महिन्यात ही नोकरी सोडावी लागेल असें वाटलें नव्हतें, पण मी स्वतः होऊनच नोकरी सोडली कारण एक चागला चान्स आला. आमच्या हॉटेलच्या समोर एक माडी आहे. त्या माडीवर काही नखरेल बाया राहतात त्या माडीवर हरतऱ्हेचे पाहुणे येतात त्याना चहा किंवा सोडा लागला म्हणजे आमच्याकडे ऑर्डर येते त्या माडीवर चहा घेऊन जाण्याचे काम माझ्यावरच सोपविलेले असतें मी एकदा हॉटेलच्या मालकाला म्हटले,

"मालक, त्या माडीवर मी जाणार नाही. तिकडच्या बायका सभ्य दिसत नाहीत !" यावर मालक माझ्यावर उसळून म्हणाले, 'गाढवा, तुला जास्त पचाग्ती हव्या कशाला ! आम्हाला सगळी गिऱ्हाइकें सारखी. धंदा आहे हा तुला नोकरी करायची नसेल तर चालता हो ! हॉटेलात कपबशा धुणाऱ्या पोराला एवढी मिजास ?"

मालक इतके गरम झाल्यावर मी काय करणार ? मी मुकाट्यानें रोज त्या माडीवर चहा घेऊन जाऊं लागलों पुढें पुढे त्या वातावरणाची मला सवय झाली. त्या बायकाचा फाजिलपणा सहन होऊं लागला तिकडे चालणारे चाळे, गाणें–बजावणें–शृगार–चेष्टा मला प्रेक्षणीय वाटू लागल्या. परमेश्वरा, केवढा लहान मुलगा मी ! माझ्या कोवळ्या मनावर हे काय संस्कार होत आहेत ! पण माणसाला कधी वाईट वळण लागेल याचा नेम नसतो आज सकाळी तर अगदी कहर झाला. त्या माडीवर आलेला एक गृहस्थ मला म्हणाला, "विनायक, तुला मी चागली नोकरी दिली तर तू करशील का ?" मी विचारले, "कसली नोकरी ?" तो म्हणाला, "दारू विकण्याची. तू लहान मुलगा आहेस. शाळेंत जात असल्याचा बहाणा करून हातात पुस्तके आणि पिशवी घे. त्या पिशवीत बाटल्या असतील. तो माल ठराविक गिऱ्हाइकाकडे पोंचता करावयाचा. यासाठी तुला रोज मी पाच रुपये देईन." रोज पाच रुपये ? एवढ्या लहान मुलाला ! वा ! किती छान नोकरी !

रोज पाच रुपये म्हणजे महिन्याला दीडशे! माझ्या बापालासुद्धा दीडशे रुपये पगार नाही! माझ्या शाळेच्या मास्तराला तर नव्वद रुपये पगार! आता मी! शिक्षण नसताना, अनुभव नसताना महिना दीडशे रुपये मिळविणार! मी एकदम त्या गृहस्थाला होकार दिला हॉटेलची नोकरी सोडली आता हातभट्टीच्या चोरट्या व्यवहारात सामील झालो पण बिघडून तर जाणार नाही ना मी?

* * *

मडळी, मला क्षमा करा मी आता साफ बिघडून गेलो आहे माझ्या हातात पैसे खुळखुळू लागल्यामुळे मला नानाप्रकारचे छद जडले हातभट्टीचा धदा म्हणजे व्यसनी लोकाशी सबध! मनावर विपरीत व अनिष्ट सस्कार झाले मी आता विड्या ओढतो, जुगार खेळतो, मट्ट्याचे आकडे लावतो, गावात रात्री अपरात्री भटकतो, अचकट विचकट गाणी म्हणतो, आणि काय सागू मडळी, एखाद्या पोरीकडे पाहून डोळेहि मिचकावतो! परमेश्वरा, काय हा माझा अध:पात! मला जे मित्र मिळाले आहेत तेसुद्धा माझ्यासारखेच आम्हा बिघडलेल्या मुलाचा एक अड्डाच जमलेला आहे घरादाराला मुकलेली बेवारशी मुले आहेत ही कोणी घरच्या दारिद्र्यामुळे, वडिलाच्या व्यसनामुळे, किंवा कुसगतीमुळे आयुष्यातून उठली आहेत आपल्या स्वतत्र भारताची ही उद्याची पिढी आहे शाळेत असताना मला मास्तर म्हणत होते, 'विनायक, तू मोठा झाल्यावर चागला नागरिक हो आणि देशाचे नाव उज्वल कर हाय! आता हाच विनायक बदमाशाच्या अड्ड्यावर मवालीपणा करीत पडला आहे! मडळी, मला क्षमा करा! मी बिघडू नये म्हणून मी खूप धडपड केली देवाची प्रार्थना केली, समाजाची प्रार्थना केली पण काही उपयोग झाला नाही! मडळी या बिघडलेल्या चुकार मुलाला क्षमा करा!'

□□□

## आपकी पसंद : ३

(फिल्मी संगीतामध्यें व्यापारी मालाची जाहिरात घुसडून दिल्यान काय मजा येत असते, याचा अनुभव श्रोत्याना आलाच आहे भारतीय नभोवाणीने ही कल्पना उचलली तर त्याचे स्वरूप कसे काय दिसेल याची कल्पना पुढें दिली आहे )

**(१) 'म्हातारा इतुका न अवघे पाउणशें वयमान-लग्ना अजुनि लहान—'**

म्हातारपणीसुद्धा आपली जवानी आणि पौरुष टिकविण्यासाठी 'नवजवानपाक' वापरा देशातील हजारो म्हातारे आमचा नवजवान पाक सेवन करून, तरुणाप्रमाणे चाळे करतात

* * *

**(२) 'जन सारे मजला म्हणतिल-कीं दारिद्र्यानें बहुतचि छळिलें-धन त्याजवळीं कांहीं न उरलें—'**

दारिद्र्याबद्दल काळजी का करीत बसता? आमच्या तेजीमंदी कचेरीला भेट द्या आणि हजारो रुपये घरबसल्या कमवा! अचूक ओपन टू क्लोज आकडा! एकवेळ अनुभव घ्या!

* * *

**(३) मजा देते है क्या यार—तेर बाल घुंगरवाले—'**

*आपले केस लांबसडक आणि काळेभोर करण्यासाठी पाडू ब्रदर्स याचे ब्रम्ही तेल वापरा या तेलात वनस्पतियुक्त द्रव्ये असून गगावन वापरण्याची बिलकूल जरूरी नाही*

**(४) 'मेरा जुता है जापानी--ये पतलून इंग्लिस्तानी-'**

मजबूत आणि टिकाऊ कोल्हापूरी वहाणा, पुणेरी जोडे, चप्पल, शूज याचे जगप्रसिद्ध व्यापारी, सभेत फेकावयाचे जोडेहि माफक भावानें मिळतील.

* . * *

**(५) 'अरसिक किति हा शेला-त्या सुंदर तनुला सोडुनी आला-'**

हरएक प्रकारचे शेले, पचे, उपरणी, धोतरजोड्या, शर्टिंग इत्यादि कापड स्वस्त भावानें मिळण्याचे एकमेव ठिकाण. सेल ! सेल ! सेल ! खास दिवाळींसाठीं हातमागावरील लुंगी-डझनास फक्त साडेतीन रुपये. धी गिरगाव लुंगी स्टोअर्स.

* * *

**(६) ' कधि करिसी लग्न माझें तुज ठावें ईश्वरा ! '**

लग्नाची चिंता का करता ? वधुवर मंडळांत आपलीं नावें नोंदवा ! अनुरूप स्थळ मिळवून देऊं. विधुराची सोय तावडतोब लावू ! कुमारिकांनीं फोटो पाठवावेत.पत्रव्यवहार गुप्त राखला जाईल.'भद्रेश्वर वधुवर मंडळ,पुणें.'

* * *

**(७) लेके पहला पहला प्यार, भरके आखों में खुमार,**
**जादूनगरी से आया है कोई जादूगर**

आंतरराष्ट्रीय कीर्तीचा महान् जादूगार प्रो. बंगाली मेस्मेरिझमवाला याचा मुक्काम सध्या मुंबईत आहे. अंतर्ज्ञानानें तुमची सर्व हालहवाल सांगतील, जादू टोणा, भूतबाधा यावर तावडतोब इलाज केले जातील.

* * *

**(८) ' काशी देखी, मथुरा देखी, देखे तीरथ सारे-**
**तेरे द्वार खडा एक जोगी—'**

दिवाळीच्या सुट्टींत काशी, प्रयाग, हरद्वार याची तीर्थयात्रा करा 'भ्रमंती यात्रा सर्व्हिस.' मध्यें आजच नावें नोंदवा. प्रवासांत ब्राह्मणी चहा आणि झोंपण्याची सुंदर सोय.

ता. क. प्रवासांत स्पेशल ब्राह्मणी चहा आणि झोंपण्याची सोय. प्रत्येक

स्टेशनवर गरम पाण्याची आघोळ प्रवासात आजारी पडल्यास उपचाराला स्मार्ट नर्स प्रवासात बायको हरवल्यास कंपनीच्या खर्चाने दुसरे लग्न लावू.

* * *

(९) 'मला मदन भासे हा मोही मना—'

आमच्या कंपनीत कपडे शिवून घेतल्याने तुम्ही मदनासारखे सुंदर दिसाल. स्पेशल 'ब्रम्हचारी सूट' शिवण्याबद्दल आमच्या कंपनीचा लौकिक आहे.

* * *

(१०) 'माडिवरी चल ग गडे, जाउं झडकरी—'

तुमची माडी अद्यावत् फर्निचराने सजवा. नवीन फॅशनचा पलंग, खुर्च्या, कोच, नवविवाहितासाठी डबल बेड वगैरे मनपसंत फर्निचरसाठी 'बेडापार फर्निचर कंपनी' या दुकानाला भेट द्या पलंग घेणारास पाळणा फुकट.

* * *

(११) 'उगिच कां कांता, गांजितां ?'

—तिची गांजणूक कशाला करता ? आता कुटुंब-नियोजनाकडे लक्ष द्या. आमच्याकडे सर्व प्रकारची शास्त्रीय साधने मिळतात धी तेलंगिची फार्मसी, पुणे.

* * *

(१२) घनःश्याम सुंदरा श्रीधरा, अरुणोदय झाला.

— *पण अरुणोदय झाला हें कसे कळणार ? बाहेर कितीहि उजाडले* तरी तुम्ही झोपूनच असता मग हपिसात जायला उशीर होतो ! म्हणून अलार्म घड्याळ अरुणोदयाबरोबर तुम्हाला जागें करील 'अमर भूपाळी वॉच कंपनी, फोर्ट, मुंबई'

ता. क. तीन वर्षाची गॅरंटी. आमच्या कंपनीतले अलार्म घड्याळ बंद पडल्यास आमचा माणूस रोज, सकाळी तुमच्या घरी तुम्हाला झोपेतून उठविण्यास येईल.

* * *

(१३) 'नच सुंदरि करूं कोपा, मजवरि करिं अनुकंपा-'

रुसलेल्या पत्नीचा कोप कसा घालवाल ? आमच्या सोनेचांदीच्या

दुकानातील चपलाहार तिला अहेर करा चोख सोन्याचे दागिने मिळण्याचे मुंबईतील विश्वासू ठिकाण 'अमेरिकन् रोल्डगोल्ड कंपनी, चोरबाजार, मुंबई'

* * * *

(१४) 'घांव घाली विठो आतां चालूं नको मंद!'

—कुठल्याहि जरूरीच्या ठिकाणी जलद पोचण्यासाठीं आमच्या कंपनीची अमेरिकन् सायकल विकत घ्या

अगदी नव्या फॅशनची आधुनिक सायकल दिवा नाही, ब्रेक नाही, घंटी नाही

——ऑटोमॅटिक फास्ट सायकल कंपनी, पुणे.

* * *

(१५) 'मेरी जान, मेरी जान, संडे के संडे'—

—आमचा संडे मसाला वापरून रविवार साजरा करा खास घरगुती कुटलेला स्पेशल मसाला हा मसाला घरातल्या घरात कुटण्यासाठी आम्ही मुद्दाम तीन लग्नें केली हजारो लोकांनी हा मसाला वापरून शिफारसपत्रे दिली आहेत

आमचा संडे मसाला इतका लोकप्रिय झाला आहे कीं सनातनी लोकसुद्धा तो वापरतात

—महमद मुर्गीवाला, मसाल्याचे व्यापारी, मुंबई

* * *

(१६) 'घर घरमें दिवाली है मेरे घरमें अंधेरा'

—घरात अंधार म्हणून कशाला रडत असता? खास दिवाळीसाठी आमच्या दुकानात विजेचे बल्ब मिळतील

— थर्ड क्लास इलक्ट्रीक मर्चंटस

ता क आमचे दिवे ऐन दिवाळीत बंद पडल्यास, कंपनीच्या खर्चाने फुक्ट मेणबत्त्या पुरवू

* * *

(१७) 'नका टाकून जाऊं, डावा डोळा पाण्यानें माझा भिजला'—

—डोळ्याच्या तमाम विकारावर नेत्र मीरपूड अजन. जिरे, हिंग, धणे यापासून तयार केलेले आयुर्वेदिक अजन तुमचे डोळे दुरुस्त करील. डाव्या डोळ्यातून पाणी येणें, उजवा डोळा फुरफुरणे, डोळे जळजळणें वगैरे तमाम नेत्रविकारावर रामबाण .

—नेत्रोद्धार कार्यालय, मथुरा

* * *

(१८) 'रिमझिम पाउस पडे सारखा, यमुनेलाहि पूर चढे'

—पावसाळ्यासाठी टिकाऊ मजबूत छत्री वापरा नवरा–बायकोला एकत्र वापरण्याजोगी मोठ्या साईजची छत्री स्वस्त दराने मिळेल दोन छत्र्या घेणारास एक रेनकोट फुकट. खास फॅशनेबल तरुण स्त्रियासाठी आत पाणी गळणारी झिरझिरीत तलम छत्री.

—ओलेती छत्री स्टोअर्स, दादर, मुंबई.

* * *

(१९) 'मेरा तन डोले! मेरा मन डोले, ए कौन बजाए बांसरिया?'

हरएक प्रकारची बासरी, फ्लूट, हार्मोनियम, सतार इत्यादि वाद्याचे मशहूर व्यापारी. बेसूर गायकाना आमची बाजाची पेटी अतिशय उपयोगी पडेल. जगातील तमाम डोंबारी आणि गारुडी आमच्याच दुकानातील पुंगी वाजवतात खास गाजराची पुंगी मिळेल, नाही वाजली तर गाजर खाऊन टाका.

—तिबूनाना तबलजी, कर्णकर्कश वाद्याचे व्यापारी, मुंबई

* * *

(२०) 'माझा होशिल का, होशिल का?'

—प्रो. बगाली याचे वशीकरण यंत्र वापरल्यास वाटेल ती स्त्री किंवा पुरुष वश होईल. खास हिमालय पर्वतावर मंतरलेला ताईत जवळ बाळगा.

नोकरी, परीक्षा, प्रेम, कोर्टखटले, रेसचे घोडे इत्यादि सर्व मनकामना पूर्ण होतात.

— बगाली जतरमंतरवाला.

# तांबट गल्लींतील तीन मासिकें

( आधुनिक मराठी वाङ्मयात भर घालण्यासाठी एक मासिक काढण्याचा विचार तांबट गल्लीतील काही साहित्यप्रेमी मंडळींच्या डोक्यात बरेच दिवस घोळत होता या योजनेचा अधिक खल करण्यासाठी श्री दामशेट दडपेकर याच्या गच्चीवर गल्लींतील लोकाची सभा भरली आहे )

दामशेट– माझ्या चाळकरी बधूनो आपण आज इथें कशासाठीं जमलो आहोत तें निराळें सांगण्याची जरुरी नाहीं आपल्या गल्लीचे एक वैशिष्ठ्यपूर्ण मासिक असावे, ही गोष्ट आम्हाला आता फार जाणवू लागली आहे आमच्या गल्लींत अनेक कवि आणि लेखक आहेत त्याचे बहुमोल वाङ्मय तसेच धूळ खात पडून आहे इतर कोणी संपादक तें छापींत नाहींत, म्हणून आमचे हक्काचे असे एक मासिक असणें फार जरूर आहे आमच्या गल्लीतील वाङ्मयाचा प्रातिनिधिक नमुना जगाच्या बाजारांत ठेवण्याची वेळ आता आली आहे

कवि धूमकेतु– महाराष्ट्रातील तमाम संपादकाचा सूड घेण्यासाठीं तरी आम्हाला मासिकाची आवश्यकता आहे हे लोक आमचे लिखाण छापीत नाहींत, तर नाकावर टिच्चून मी माझ्या कविता आमच्या मासिकाच्या पहिल्या पानावर प्रसिद्ध करून दाखवीन आमच्या हक्काचे, आमच्या मालकीचे, आमच्या गल्लीचे असं स्वतंत्र मासिक सुरू झाले तर आमच्या प्रतिभेला भरपूर वाव मिळेल आज आमची कविता गल्लीतल्या गल्लींत कोंडून गुदमरून जात आहे –

काशिराम कोळंबेवाले– मासिकाचा मुख्य संपादक मलाच करावे अशी

माझी सूचना आहे माझ्या कोळशाच्या वखारीत मासिकाची कचेरी उघडण्यास मी जागा देईन शिवाय, माझ्या गिऱ्हाइकाच्या गळ्यात कोळशाच्या गोणीबरोबर एक एक अंक बांधण्याचा धंदेवाईकपणाहि माझ्यामध्यें आहे

बाळोपंत बोलभांडे– काशिराम कोळसेवाले याची सूचना मला मान्य आहे ते मुख्य संपादक होत असतील तर सहाय्यक म्हणून कार्य करण्यास माझी तयारी आहे

दामशेट– मासिकाचे नाव 'मर्द-मेवा' असे ठेवावे अशी माझी सूचना आहे कारण आपण सारे मर्द आहोत, आणि हें मासिक केवळ चाळीतल्या पुरुषवर्गाचेच राहणार आहे आपल्या मासिकात स्त्रियाचे लेख मुळीच येणार नाहीत, अशी खबरदारी घेणें जरूर आहे

कवि धूमकेतु– छे ! छे ! मला हें धोरण बिलकुल पसत नाही धद्याच्या दृष्टीने आणि कलेच्याहि दृष्टीने हें योग्य नाही सपादक–मडळावर एक तरी बाई असावी, निदान बायकाचे लिखाण तरी आपल्या मासिकात येणे जरूर आहे

दामशेट– तुम्ही अविवाहित आहात म्हणून असे बोलता ! आजपर्यंत मी पाच लग्नें केलीं, पण एकहि बायको काही धड निघाली नाहीं !

काशिराम कोळसेवाले– अगदी बरोबर ! माझाहि तोच अनुभव आहे त्याचे लेख घ्यायचे म्हणजे आम्हीच त्याना लिहून द्यावे लागेल ! ही कटकट कशाला ? म्हणून मी म्हणतो कीं, आपल्या 'मर्द-मेवा' मासिकात स्त्रियाना मुळीच थारा देता कामा नये !

बाळोपत–दामशेट आणि काशिराम याच्या म्हणण्याला माझा दुजोरा आहे आपल्या ताबटगल्लीतल्या स्त्रिया आजकाल कशा चढेल बनल्या आहेत त्या तुम्ही पाहाताच आहात ! आम्हाला आमच्या मासिकातून या स्त्रियाच्या फॅशनविरुद्ध जोरदार हल्ले चढवायचे आहेत या स्त्रियाच्या डोळ्यात क्षणक्षणीत अजन घालून त्याना ताळ्यावर आणण्यासाठी आपण लेखणी चालविली पाहिजे आणि स्त्रियांचे कर्तव्य काय आहे हेंहि आम्ही आमच्या 'मर्द–मेवा' या मासिकातून दाखवून देणार !

दामशेट–चला तर ! आता आपण आपल्या नवीन मासिकाच्या तयारीला लागू या ! 'मर्द–मेवा'चा विजय असो

(आणखी दोन महिन्यानंतरचा काळ ताबट गल्लीतील स्त्रियांची सभा भरली आहे सौ. दामिनी दामशेट, सौ कावेरी काशिराम, कवयित्री बाणगंगा, इत्यादि महिला सभेला हजर आहेत )

सौ. दामिनी–माझ्या चाळकरी भगिनींनो, एका गंभीर प्रसंगाचा विचार आपल्याला आज करायचा आहे

सत्यभामा–खरच ग बाई ! या कावेरीच्या यजमानाच्या दुकानातले कोळसे काही केल्या पेटत नाहीत

सौ. दामिनी–तो विचार नव्हे ! त्यापेक्षा महत्वाचा विचार आपल्याला करायचा आहे आपल्या गल्लीतले पुरुष आजकाल कसे बहकले आहेत ते तुम्हाला माहीत आहेच

चपावती–आमच्या घरचं तर विचारू नका ! आमचे हे, रोज रात्री उशिरा घरी येतात आणि ताण ताण् करून–

सौ दामिनी–तो विषय नव्हे ! दुसराच एक महत्वाचा प्रश्न आपल्यापुढे आहे आमच्या गल्लीतल्या पुरुषांनी आम्हाला न विचारता एक मासिक सुरु केले आहे–

कवयित्री बाणगंगा–शेम ! शेम ! त्या मासिकाचं तळपट होवो !

सौ. दामिनी–आम्हा स्त्रियांच्या बाबतीत केवढा अन्याय हा ! संपादक–मंडळावर एकहि स्त्री नाही ! आमचे लेखहि ते छापीत नाहीत ! म्हणजे हे पुरुष आम्हाला समजतात तरी काय ? आम्हाला अक्कल नाही काय ? आम्ही लेख लिहू शकत नाही काय ? आम्ही हातात बांगड्या भरल्या आहेत काय ? आम्हाला आमचं स्वतंत्र मासिक काढता येत नाही काय ?

सत्यभामा–आम्ही अशी छपन्न मासिके काढून दाखवू ! आज रात्रीं ते घरी येऊ देत, म्हणजे खिशातून लेख काढून घेतें–

बाणगंगा–आपल्याला पुरुषांचे लेख नकोत आहेत आम्ही आमच्या स्वतःच्या हिंमतीवर मासिक सुरू करणार आहोत या मेल्या पुरुषांची चांगली खरडपट्टी काढू !

सौ. दामिनी–त्यांनी आपल्या मासिकाचे नाव 'मर्द-मेवा' ठेवले आहे, तर आम्ही आमच्या मासिकाचे नाव 'महिला-मेयकूट' असं ठेवू !

सत्यभामा–मुख्य संपादिका म्हणून माझी योजना करा. कारण आमचे हे काळयाबाजारातून बराच पैसा आणतात, खर्च तरी करून टाकतें !

सौ. दामिनी–पण तुमच्यामागें पोराबाळांचे बरेंच लटांबर आहे शिवाय सैंपाकपाणी–

सत्यभामा–त्याची काळजी करूं नका ! ही सारी कामं मी त्यांच्या-कडे सोंपवीन.

बाणगंगा–छान ! अशी धडाडी पाहिजे ! या पुरुषांची चांगली खोड मोडली पाहिजे नाहीतरी आम्ही बायकांनी प्रगति करायची कशी !

सौ. दामिनी–चला तर ! आपण आता 'महिला–मेंथकूट' या आपल्या मासिकाच्या तयारीला लागू या !

(आणखी एक महिन्यानंतरचा काळ तांबट गल्लीतील मुलांची सभा भरली आहे. कुमार चिंतू, कुमार बाळू, कुमार मन्या, कुमार मधु, इत्यादि बाळगोपाळ सभेला हजर आहेत.)

चिंतू–कळलं काय रे किश्या ? आपल्या गल्लीत दोन मासिकं निघाली आहेत. एक पुरुषांच आणि एक स्त्रियांच !

किश्या–मग आम्हींच काय पाप केलं आहे ? आम्हा मुलांच का एक असूं नये !

मन्या–ही वडील माणसं मोठी शिष्ट आहेत ! आमचे लेख कांहीं कोणी छापीत नाहींत !

मधू–यानांच काय तेवढी अक्कल आहे ! काय भिकार लेख लिहितात हे मोठमोठे लोक ! 'मर्द–मेवा' मासिकातला माझ्या बाबांचा लेख तर अगदींच भिकार आहे !

चिंतू–आणि 'महिला–मेंथकूट' मधली माझ्या मावशीची कविता भयंकरच अर्थशून्य आहे ! म्हणून म्हणतों किश्या, आपणहि एक मासिक काढून दाखवू या लोकांना ! आम्हीं लहान असलों तरी या वडील मंडळीपेक्षा कितीतरी शहाणे आहोंत !

किश्या–चला तर ! करूंच सुरुवात आता ! आमच्या मासिकाचे

नाव 'बाळकडू' ठेवू या ! आणि या ताबट गल्लीतल्या मूर्ख स्त्रीपुरुषाना अक्कल शिकवू या !

(आणखी तीन महिन्यानंतरचा काळ ताबट गल्लीतल्या रहिवाशावर सरकारकडून पुढील नोटीस बजावण्यात आली आहे )

## नोटीस

ज्याअर्थी ताबट गल्लीतील शाततेला धोका येण्यासारखी परिस्थिति निर्माण झाली आहे, त्याअर्थी त्या ठिकाणी प्रकाशित होणारी 'मर्द-मेवा', 'महिला-मेथकूट' व 'बाळकडू' ही तिन्ही मासिकें ताबडतोब वद करण्यात यावी, असा हुकूम सोडण्यात येत आहे. ताबट गल्लीत प्रसवणाऱ्या या वाङ्मयामुळें तेथें पुरुष, स्त्रिया आणि मुलें असे तीन तट पडले असून एकंदर वातावरण प्रक्षोभक बनले आहे. परस्पराविरुद्ध टीकेची झोड उडवून एकमेकाच्या उखाळ्यापाखाळ्या काढणारा मजकूर या तिन्ही मासिकात प्रसिद्ध होत असल्यामुळें, ताबट गल्लीत गृहकलहाना ऊत आला आहे. गेल्या तीन महिन्यात नवरा-बायकोचे अठरा तटे आणि पाच घटस्फोट घडवून आले आहेत त्याचप्रमाणे वडील मडळींविरुद्ध लहान पोरानी आघाडी खोलली असून ससाराची घडी विस्कटून गेली आहे. या एकंदर अनर्थाला ताबटगल्लींतील वाङ्मयच जबाबदार असल्यामुळें, त्या ठिकाणी प्रकाशित होणारी तिन्हीं मासिकें वद पाडणें सरकारला इष्ट वाटत आहे

□□□

# उरलेल्या वृक्षांचा विलाप !

आम्हीं आता फार थोडे जण शिल्लक आहोत आमचे हजारो वृक्ष-बांधव आम्हाला सोडून गेले आहेत ! वादळी वाऱ्याच्या घातपाती कृत्याने वृक्ष-जमातीचा भयंकर संहार केला आणि विनाशाचे भयंकर स्वरूप दाखविले. त्या विनाशातून आम्ही आता फार थोडे जण वाचलो आहोत आमचे ईष्टमित्र, प्रियजन आणि सगेसोयरे वादळाच्या झपाट्यात गतप्राण होऊन धरणीवर अस्ताव्यस्त पडले आहेत इतस्त पसरलेल्या या मुडद्याच्या राशी-वर अश्रू ढाळण्यासाठी आम्ही आता फार थोडे जण जिवंत आहोत मृता-त्म्याच्या समाध्यावर फुलें आणि पाने ढाळणे एवढेंच एक काम आम्हाला आता उरले आहे ! पण मृतात्म्याना पुष्पांजली वाहण्याचेहि त्राण आम्हाला आता राहिले नाही कारण आमचेच जीवन पर्णहीन आणि शुष्क बनले आहे सर्वस्वाला मुकलेल्या निर्वासिताप्रमाणे आम्ही कफल्लक आणि कंगाल बनलो आहोत. आमच्या अंगावरील फळाफुलाचे वैभव वादळी गुंडानीं लुबाडून नेले आहे !

कित्ती ठार आणि किती जखमी झाले याला गणतीच नाहीं. वादळाने आम्हा वृक्षावरोबर जणू कांही जातीय दंगाच केला मायेफिरू पिसाट वाऱ्याने आपल्या पाशवी शक्तीचे भेसूर प्रदर्शन केले आणि लक्षावधि निर-पराध झाडाझुडपाचा बळी घेतला ! वृक्षाची प्राणहानी आणि वित्तहानी अगणित झाली एका प्रवासी कावळयाने अशी दिलफोडक बातमी आणली आहे कीं, माडूपच्या पलीकडे दर मैलागणिक दीड हजार झाडें कोसळून पडलीं आहेत ! याशिवाय बाग-बागाइताची जी नासधूस झाली, तिचे हृदय-

द्रावक वर्णन करताना कावळ्याचा कंठ दाटून आला एकदर विध्वसाचा कहर झाला यात शकाच नाही इतर कुठें कुठें काय अनर्थ झाला असेल तो असो, पण मुबापुरीच्या परिसरातील आम्हा वृक्ष जमातीचे जीवन सपूर्णपणे उध्वस्त झालें आहे या रमणीय शहरातील मोठमोठे ख्यातनाम, वजनदार नि ऐतिहासिक वृक्ष एकामागून एक पटापट गडगडून जमीनदोस्त झाले ? पाच पाच मजली इमारतीच्यावर उच मान करून ताठ राहिलेले वैभवशाली वृक्षराज आता हिंदुस्थानातील सस्थानिकाप्रमाणे कबरडे मोडून, लोकशाहीच्या धुळींत लाचारपणें विलीन होऊन पडले आहेत असख्य वृक्षाचा दिमाख, ताठरपणा, ऐतिहासिक महत्व, सर्व काही वादळाने उडवून लावले आहे ! वादळाचे सामर्थ्य ओळखून काही वृक्ष तावडतोब शरण गेले, पण ज्या काहींनीं टिकाव धरण्याचा प्रयत्न केला त्याचा अखेर चेदामेंदा झाला !

आम्ही आता फार थोडे जण शिल्लक आहोत आम्ही कसे काय जिवत राहिलो तें परमेश्वरालाच माहीत ! आमचे सर्वांग थरथरत होते आणि पाय लटपटत होते जमिनीवर लोटांगण घालण्यास आमची सपूर्ण तयारी होती तो प्रसगच तसा घातपाती होता काळपुरुषाला बेहोष मस्ती चढली होती. एखाद्या मदोन्मत्त हत्तीने केळीचा खुट उपटून आपल्या सोंडेने अस्मानात भिरकावून द्यावा त्याप्रमाणे मोठमोठे वजनदार वृक्ष हवेत फेंकले जात होते मेलेल्या उदराला शेपटीला धरून जसा फेकून देतात, तसे ताडामाडाच्या शेंड्याना धरून कोणीतरी फेंकून देत आहे असें वाटत होते अशा या घनचक्कर वावटळींत आणि रणधुमाळींत आम्ही थोडे जण कसे काय जिवानिशी सुटलो हें मोठेंच नवल आहे कदाचित् लाखो वृक्षाचे बळी घेऊन वादळ थकले असावे, म्हणून आमच्या वाटेस ते आले नसावे किंवा धारातीर्थी पतन पावलेल्या या अगणित मुडद्याची उत्तरक्रिया करण्यासाठी आम्हा थोडक्या जणाना त्या वादळाने जिवत ठेवले असावे !

आम्हाला जास्त वाईट वाटते तें आमच्या शेजारच्या मृत झाडाबद्दल ! या जगात चागला शेजारी मिळणे ही एक भाग्याची गोष्ट असते सुदैवान दहावीस प्रेमळ शेजारी आम्हाला लाभले होते, ते सर्व परवाच्या वादळात खलास झाले ! मरणकाळची त्याची तडफड आणि धडपड अत्यत हृदयद्रावक होती. एका बालवृक्षाने फोडलेली करुण किंकाळी अजून आमच्या

कानात घुमत आहे या बालवृक्षाची मुंडी मुरगाळून- त्याला उपटून काढताना त्या वादळी राक्षसाला जरासुद्धा दयामाया आली नाही! हा बालवृक्ष म्हणजे एक नाजुक असे आब्याचे रोपटें होतें पधरा ऑगस्ट रोजीं एका थोर देशभक्तानें मोठ्या समारमपूर्वक त्याची इथें प्रतिष्ठापना केली होती हें रोपटें रोवताना त्याने एक जबरदस्त व्याख्यान दिले आणि झाडें लावण्याबद्दल जनतेला उपदेश केला होता त्या गोष्टीला तीन महिने लोटले नाहीत तोच विघ्नसतोषी वादळाने त्या रोपट्याला मुळासकट उखडून काढावे हें सुदैव होय वृक्षारोपण-मोहिमेचा अगदी बोजवारा उडाला! 'झाड लावा, झाड लावा,' म्हणून कठशोष करून लावण्यात आलेल्या त्या झाडाला अखेर हेच फळ यावे काय? मोठ्या परिश्रमानी लावलेली हजारो झाडें एका रात्रीत उध्वस्त झाली! आज राष्ट्राला वृक्षाची केवढी जरूरी आहे याची वादळाला कल्पना आहे काय? देशातील विचारवत पुढारी वृक्षारोपण करून विधायक कार्य करीत असताना, दुष्ट वादाळाने वृक्षविच्छेदनाचा देशद्रोही कार्यक्रम हाती घ्यावा या अनर्थाला काय म्हणावे? तरीहि अशा परिस्थितीत चिकाटीनें पुन्हा झाडें लावा, हाच या पडलेल्या झाडाचा तुम्हाला सदेश आहे

हा आणखी एक मुडदा पाहून आम्हाला अत्यत दुःख होत आहे हा नारळाचा वृक्ष आहे अलीकडे बराच उंच वाढला होता आणि गावात नारळ स्वस्त करण्यासाठी उत्पादनहि खूप करीत होता याच्या नारळात आणि अगात भरपूर पाणी असतानाहि तुफानी वादळाच्या पहिल्याच तडाख्यात तो आपटला! प्रथम याचा शेंडा जोरजोराने हेलकावे खाऊ लागला नतर अधिकच हिसके बसू लागून दारू प्यालेल्या माणसाप्रमाणे तो उलटसुलट झोंकाड्या खाऊ लागला! शेजारच्या पिंपळाला मदतीसाठीं त्यानें हाक मारली, पण त्यापूर्वीं तो पिंपळच कोसळून पडला होता एवढें मोठें पिंपळाचे धूड कोसळून पडलेलें पाहताच या माडाची कबर खचली आणि दुसऱ्याच क्षणीं तोहि त्याच्यावर आडवा पडला! तो पडल्याबरोबर काही माणसे धावून आलीं! आम्हाला वाटले त्याला उपचार करण्यासाठीं हे परोपकारी नागरीक धावून आले असावेत! पण छे! जमिनीवर गतप्राण होऊन पडलेल्या त्या दुर्दैवी वृक्षाच्या अगाखाद्यावरील नारळ लांबविण्यासाठीं ते

सज्जन आले होते प्रेताच्या अगावरील दागिने काढून घेण्याची रीतच आहे मुळी ! असो हा नारळाचा वृक्ष पडल्यानतर सुमारे अर्ध्या तासाने कोपऱ्यावरच्या एका वटवृक्षाने साष्टाग नमस्कार घातला ! वटसावित्रीच्या दिवशी ज्या वृक्षापुढें सुदर सुदर स्त्रिया येऊन नमस्कार घालीत असत त्या भाग्यवान् वृक्षाने वादळापुढें साष्टाग नमस्कार घातला हा दैवदुर्विलास होय ! हा वृक्ष उमळून पडल्यामुळें हिंदु ललनाना फारच दु ख होणे स्वाभाविक आहे वटवृक्षाभोवती प्रदक्षणा घालणाऱ्या भाविक स्त्रियाची आता खूपच गैरसोय झाली आहे

ईश्वरी इच्छेशिवाय झाडाचे एक पानहि हलत नाही असें म्हणतात मग इतकीं कोटीं कोटी पाने जी हादरली आणि भेदरली ती ईश्वरी इच्छेवाचून अस कसे म्हणता येईल ? आणि ईश्वर जें करतो ते बऱ्यासाठीच करतो यात शका कसली ? कदाचित् या देशाला नवीन घरे बाधण्यास लाकूड मिळावे म्हणून किंवा सैंपाक करण्यास सर्पण मिळावे म्हणून इतक्या झाडाची मोडतोड झाली असावी ! किंवा मुबई शहरात खूपच गर्दी झाली असल्यामुळें, झाडानी अडविलेली जागा मोकळी करून देण्याचा ईश्वरी हेतु असावा ! पण सरकारी हुकुमाची अमलबजावणी करताना पोलीस जसा आडमुठेपणा करतात, तशी ईश्वरी हेतूची अमलबजावणी करताना वादळाने फाजील दादागिरी दाखविली ! कोणती झाडे ठवावीत आणि कोणतीं झाडें पाडावीत, याचा जरासुद्धा सारासार विचार वादळाने केला नाही श्रीमताच्या बगल्यासमोरील माडवलशाही वृक्ष वादळाने पाडले, तसेच गरिबाच्या झोपडीजवळील लाचार वृक्षहि वादळाने उपटले ! कपू किंवा गट करून राहिलेले पक्षनिष्ठ वृक्षहि वादळाने उखडले, तसेच दूर, एकाकी राहिलेला एकांडा शिलेदारहि वादळाने झोडपून काढला ! घोर विरहाने झुरणीस लागलेला, वठलेला वृक्ष लायेच्या ठोकरीने वादळान उडवून दिला, तसाच नाजुक वेलीच्या आलिंगनात मशगूल होऊन पडलेला प्रेमी वृक्षहि वादळाने आपल्या कराल दाढेत रगडून टाकला ! रठ्ठ आणि हाडकुळा उच आणि ठेंगू, म्हातारा आणि जवान, जहाल आणि मवाळ, सर्वच वृक्षाचा वादळाने चट्टामट्टा करून टाकला ! राक्षसी अत्याचाराच्या वरवटयाखालीं सरसकट सर्वच झाडें भरडून निघाली !

आता आम्ही फार थोडे जण शिल्लक आहोत ! या असख्य मुंड्याच्या राशीकडे भकास नजरेने पहात उभें आहोत मृतात्म्यावर अश्रू ढाळणे आणि मृताच्या कुटुबीयाना दिलगिरीचे सदेश पाठविणे एवढेंच आमचे काम आहे. मरणाऱ्याना आम्ही वाचवू शकलो नाही, निदान एवढें तरी करून मोठेपणा का न घ्या ! असो. या भीपण रणधुमाळीत ज्या वीर वृक्षानीं धडाडीचा प्रतिकार केला त्याच्याबद्दल चार शब्द बोलणे या प्रसगी योग्य ठरेल एका पराक्रमी वृक्षाने सतत सात तास वादळाच्या तुफानी आक्रमणाला मोठ्या धडाडीने टक्कर दिली, शेवटीं लढता लढता तो वीर धारातीर्थी पतन पावला ! दुसऱ्या एका वृक्ष सेनापतीनें आपल्या शभर सामर्थ्यवान बाहूनी वादळाबरोबर निकराची झुज दिली त्याचे सर्वबाहू निखळून पडले शेवटी शेंडाहि धडावेगळा झाला, तरी तो बहाद्दर नुसतें धड घेऊनच लढत होता! शेवटी एका जबरदस्त तडाख्याने तें धड छिन्नभिन्न झाले ! एका म्हाताऱ्या वृक्षाने तर तरुणानाहि लाजविणारे शौर्य गाजविले मध्यरात्रीपासून सकाळी साडेनऊ वाजेपर्यंत तो वादळाबरोबर कुस्ती खेळत होता शेवटी शेजारच्या छपरावर मस्तक आपटून रक्तबबाळ झाला ! अशा रीतीने अनेक वृक्षानी सकटकाली पराक्रमाची शिकस्त केली ! काही स्वाभिमानी वृक्षानी ' मोडेन, पण वाकणार नाही ' असा निर्धार केला त्याप्रमाणे ते मोडले पण वाकले नाहीत ! त्या सर्वांना धन्यवाद देणे आम्हा उरलेल्या वृक्षाचें पवित्र कर्तव्यच आहे !

मृतात्म्याना ईश्वर शाति देवो ! पण आम्हा जिवत आत्म्याना कधी शाति मिळेल तें कळत नाहीं आम्हीं आता फार थोडे जण शिल्लक आहोत. गावात तोंड दाखवायला आम्हाला आता लाज वाटते. कारण लोक आमच्या दुर्दशेकडे बघून आमची कींव करतात स्वाभिमानी प्राण्याला दुसऱ्यानें दया दाखविली की, त्याला भयकर यातना होतात रस्त्यावरून जाणारी येणारी माणसे आमच्याकडे पाहून हळहळतात इतकेच काय, पण दीड दमडीचे क्षुद्र कावळेहि कर्कश गळा काढून आमच्याबद्दल सहानुभूति प्रगट करतात ! ही दयाच मोठी तापदायक असते ! आज आम्हीं उरलेले वृक्ष विकलाग आणि हतबल होऊन उभे आहोत एखाद्या लुटारूने सुरा दाखवून जसे धन लुबाडावे तशी वादळानें आमच्या अगावरील सर्व दौलत लुबाडून नेली आहे

तरीपण वसंतऋतूमध्ये पुन्हा आम्हाला बहर येईल अशी आशा वाटत आहे. आता पडलेल्या झाडाबद्दल अधिक शोक करीत बसण्यापेक्षा पुन्हा अधिक झाडें लावण्याचा उद्योग करणे हेंच तुमचें आमचें कर्तव्य आहे.

□□□

## स्वच्छ नवरा मोहीम : ६

### जाहीर पत्रक

गडेरी आळीतील तमाम विवाहित स्त्रियास कळविण्यात येतें की,गल्लीतील महिला संघटनेतर्फे 'स्वच्छ नवरा मोहीम' नावाची चळवळ लौकरच सुरू होणार आहे या सप्ताहात घरोघरच्या गलिच्छ नवऱ्याना स्वच्छ करण्याचे कार्य पार पडेल. आपण घरातल्या व शहरातल्या स्वच्छतेकडे लक्ष देतों तसे नवऱ्याच्या स्वच्छतेकडे लक्ष देत नाहीं हे दुर्दैव होय. आपल्या गल्लीत कितीतरी घामट, अस्वच्छ, ओंगळ नवरे आहेत आणि अशा नवऱ्याची आपण पतिदेव म्हणून पूजा करतो ही अतिशय लाजिरवाणी गोष्ट होय म्हणून अगोदर आपण हे नवरे स्वच्छ केले पाहिजेत ! आपल्या गल्लीतील आर्यस्त्रियाना पतिशुद्धीचे महत्त्व पटवून द्यावे या पवित्र हेतूने 'स्वच्छ नवरा मोहीम' सुरू करण्याचे आम्ही योजिले आहे.

आपल्या गडेरी आळींतील उत्साही कार्यकर्त्या सौ. नीरा नाठाळ, सौ. तारा तोंडाळ, सौ वेणू वाचाळ, सौ बेबी बोलभाड वगैरे महिलाचा या मोहिमेला जोरदार पाठिंबा आहे या सप्ताहांत तूर्त पुढीलप्रमाणें कार्यक्रम आखले आहेत

### विविध कार्यक्रम

(१) गल्लींतील स्त्रियाची संगीत प्रभात-फेरी.

(२) 'स्वच्छ नवरा मोहिमे'चे उद्घाटन : श्रीमति गिरकोबाई गळेपडू याच्या हस्तें.

(३) गल्लींतल्या नवऱ्याना सामुदायिक आघोळ ( त्याच्या बायकाकडून सार्वजनिक नळावर )

(४) नवऱ्याना धोतर, उपरणे वगैरे नवे वस्त्रदान श्रीमति कालिदीबेन काडवाला याच्या हस्ते

(५) नवऱ्याच्या जुन्या गलिच्छ कपडयाची होळी ( या प्रसगी हातात मशाली घेतलेल्या स्त्रिया जाळपोळीचे क्रातिगीत म्हणतील )

(६) सगीत 'पतिशुद्धि' नाटकाचा प्रयोग (गल्लीतल्या महिलाकडून)

(७) 'नवऱ्यासाठीं कोणता साबण चागला ?' या विषयावर तारा तोंडाळ आणि वेणू वाचाळ याची सप्रयोग भाषणे या प्रसगी नवऱ्याला साबण चोळण्याचे प्रात्यक्षिक करून दाखविले जाईल

(८) स्वच्छ नवऱ्याचे प्रदर्शन पहिल्या तीन नवरच्या स्वच्छ नवऱ्याना ( म्हणजे त्याच्या बायकाना ) बक्षिसे देण्यात येतील

(९) नवऱ्यावर D. D T चा प्रयोग स्त्रियाची सायकल-मिरवणूक. चौपाटीवर विसर्जन पतीसह समुद्रस्नान नवऱ्याना समुद्रात बुचकळून काढल्यावर 'वदे मातरम' म्हटल्यावर 'स्वच्छ नवरा मोहिमे'ची समाप्ति

वर दिलेल्या कार्यक्रमात वेळप्रसगी फेरफारहि होतील आपल्या गडेरी आळीतल्या विवाहित स्त्रियानी हा स्वच्छता सप्ताह साजरा करण्याच्या कामीं सर्वतोपरी सहाय्य करावे, आणि प्रत्यक्ष भाग घेऊन सब कार्यक्रम यशस्वी करावे, अशी विनती आहे

आपली,
**कालिंदी फोलदांडे**
कार्यवाह, गडेरी आळी
महिला सघटना

× × ×

गडेरी आळीने सुरू केलेली ही नाविन्यपूर्ण मोहिम मुबईच्या इतर भगिनींनाहि पसत पडली आणि या मोहिमेच्या चालक मडळाकडे अनेक पत्रे व शुभसदेश येऊ लागले आहेत कोबडी गल्लीतल्या सौ सुद्रीबाई सुठवडेकर लिहितात—

"तुमच्या 'स्वच्छ नवरा मोहिमे'ला माझा पूर्ण पाठिंबा आहे आज राष्ट्राला स्वच्छ नवऱ्याची अत्यंत आवश्यकता आहे खुद्द आमच्या घरचेच उदाहरण पहा आमचे हे आठ आठ दिवस आघोळ करीत नाहीत हजामत करीत नाहीत लुंगी सोडा आणि चांगलें स्वच्छ धोतर नेसा म्हटले तर ऐकत नाहीत! अशा पुरुषावरोबर कसे बाई दिवस काढावे म्हणून तुमच्या 'स्वच्छ नवरा मोहिमे'चे मला अतिशय महत्त्व वाटते"

× × ×

गाजड वाडीतील एक सार्वजनीक सेविका कु चवळीबाई लिहितात--

## जगाला नवरा दिसतो

"माझे लग्न झाले नसले तरी 'स्वच्छ नवरा मोहिम'त भाग घ्यायला मी तयार आहे कारण, नवऱ्याना कसे स्वच्छ ठेवायचे याचे शिक्षण आम्हाला आतापासूनच मिळालले बर एकवेळ आपल्या घरात घाण असली तरी चालेल स्वयपाक खोलीतल्या स्वच्छतेकडेहि फार लक्ष देण्याची जरुरी नाही, पण नवऱ्याच्या स्वच्छतेकडे स्त्रियानी लक्ष ठेवायला हवे' कारण, आपले सैपाकघर लोकाना दिसत नाही नवरा मात्र जगाला दिसतो आणि नवऱ्यावरुन बायकोची परिक्षा लोक करतात

× × ×

भानगड गल्लीतील लखिका रेवडीबाई रडकुड लिहितात

## शीलाचीहि शुद्धि करा

"शरीराच्या स्वच्छतेवरोबरच नवऱ्याच्या शीलाचीहि साफसफाई आपण केली पाहिजे म्हणून नवऱ्याच्या हातात अश्लील वाङमय देता कामा नये चावट सिनेमा पाहण्यासहि नवऱ्याला बंदी करावी आज नवकाव्य आणि नवकथा याच्या वाचनाने पुष्कळ नवरे बिघडले आहेत म्हणून नवऱ्याचं शील सुरक्षित कस राहाव ही मोठीच चिंता आम्हा स्त्रियाना लागली आहे अशा वेळी गडेरी आळीतल्या महिलानीं 'स्वच्छ नवरा मोहीम' सुरु केली हें राष्ट्राचे मोठेंच भाग्य होय."

× × ×

छाकटे आळीतील एक आर्यमहिला लिहिते--

## नवरा दंगा करील !

" गडेरी आळीतल्या महिलानीं हाती घेतलेले पतिशुद्धीचे कार्य अभिनदनीय आहे गडेरी आळीच्या चळवळीला छाकटे आळीचा पूर्ण पाठिंबा आहे हें सागायला नकोच खुद्द माझ्या घरी हें कार्य मी किती दिवसापासून गुपचूप चालविले आहे आमच्या गल्लीत माझाच नवरा तेवढा स्वच्छ दिसतो त्याचे कारण हेंच पण हें कार्य बरेच कष्टाचे व दगदगीचे आहे नवऱ्याला स्वच्छ करणे हे वाटते तितके सोपे नाही सुरवातीला नवरा आरडाओरडा करतो, दगामस्ती करतो, बायकोला मारहि खावा लागतो, म्हणून या कामीं फार चिकाटी, धैर्य आणि नवऱ्याबरोबर मारामारीहि करण्याची तयारी असावी लागते गडेरी आळीतील शूर स्त्रिया हें कार्य यशस्वीपणे पार पाडतील अशी मी आशा करतें "

वरीलप्रमाणे आणखी कितीतरी सदेश आले काहीकडून जारदार पाठिंबा मिळाला गडेरी आळींतल्या स्त्रियाना उत्साह वाटू लागला आणि त्यानी आपली मोहीम सुरु करण्याची जगी तयारी चालविली पण इतक्यात काहींतरी घोटाळा झाला आणि पुढील पत्रक प्रसिद्ध झाले.

× × ×

### पत्रक नं. २

### सर्व नवरे बेपत्ता

गडेरी आळीतल्या तमाम स्त्रियाना कळविण्यात येतें की आमची सकल्पित 'स्वच्छ नवरा मोहिम' बेमुदत पुढें ढकलण्यात आली आहे. कारण या मोहिमेच्या भीतीने गल्लींतले सारे नवरे फरारी होऊन बेपत्ता झाले आहेत. गल्लींत एकहि नवरा शिल्लक नाहीं. त्यामुळे आपलें पतिशुद्धि कार्य अडून राहिले आहे. नवराच ठिकाणावर नाहीं तर स्वच्छतेचे प्रयोग कुणावर करणार ? तरीपण आम्हीं डगमगणार नाहीं सर्व बेपत्ता नवऱ्याचा शोध जोरात चालू आहे. पोलीस ठाण्यावरहि वर्दी दिली आहे लौकरच सर्व नवऱ्याना पकडून आणू आणि आमची मोहीम सुरु करू अशी आम्हाला उमेद

आहे. आमची चळवळ यशस्वी केल्याशिवाय आम्ही रहाणार नाही. पण तूर्त नवऱ्याचा शोध लागेपर्यंत 'स्वच्छ नवरा मोहीम' बेमुदत तहकूब ठेवली आहे हें सर्वांनी लक्षात ठेवावे.

आपली
कालिंदी कोलदांडे
कार्यवाह, गडेरी आळी
महिला संघटना.

□□□

# गुलाबजांबू

पहाटे चार साडेचार वाजले असतील  दिवाळी अंकासाठी काहीतरी लेखन करावें म्हणून मी बसलो पण काय लिहिणार कपाळ ! डोकें बिलकूल चालत नव्हतें इतक्यात बाहेर रस्त्यात 'चोर चोर' अशी हाकाटी झाली मी व्हराड्यात येऊन पाहू लागलो जरा खळबळ दिसून आली अंधारांत दहा पाच माणसे इकडून तिकडे आणि तिकडून इकडे पळत होती चोराला पकडण्यासाठी ती धांवपळ असावी एक पोलीसहि हातात दाडका घेऊन माझ्या गल्लीतून धावताना दिसला पाच दहा मिनिटें गडबड चालली नंतर एकदम शांत झाले चोर सापडला की नाही ते कळले नाहीं, मी दरवाजा उघडला म्हटले, खाली उतरून जरा चौकशी करू काय प्रकार आहे तें बघू पण दाराबाहेर पाऊल ठेवताच मला धक्का बसला एक इसम कावराबावरा होऊन तिथ आडोशाला उभा होता भीतीने त्याचा चेहरा गागरला होता

तो माणूस एकदम आत शिरला आणि म्हणाला, "दत्तोबा, दाराला कडी लावून घ्या "

त्यानेच कडी लावली मी हतमूढ झालो ह्या माणसाला, माझें नाव कसे कळले ? हा कोण माणूस एवढ्या अपरात्री एकदम आत घुसतो-आणि घाईघाईनें दरवाजा बंद करतो ! मी पाहातच राहिलो

त्या माणसाला जरा धीर आला रुमालाने घाम पुसून घेत तो म्हणाला, "तुमच्या नावाची पाटी दारात वाचली नाव ओळखीच तुमचे लेख आम्ही वाचतों तुम्हीं इथें राहात असाल अशी कल्पना नव्हती, पण काय योगायोग बघा ! आपली प्रत्यक्ष भेट झाली "

## ४२ : आंवळ्या भोपळ्यांची मोट

त्यानें खिशातून कागदाचा एक पुडका काढला. त्या पुडयात पाच गुलाबजांबू होते. त्याचा पाक कागदाला बरबटला होता. अधीरतेनें तो माझ्या कानांत पुटपुटला, "कृपा करून हे एवढे खाऊन टाका. उपकार होतील लवकर खाऊन घ्या. मी स्वत: खाल्ले असते, पण मला गुलाबजाबू आवडत नाहींत."

मी विचारात पडलों. ह्या अनोळखी माणसाचे गुलाबजाबू कसे खावे ? पण तो खूपच आग्रह करू लागला, आणि मलाहि भूक लागली होती. मी ते सगळे गुलाबजाबू खाऊन टाकलें

माझें खाणें संपताच त्यानें सुटकेचा श्वास सोडला. दोन्ही हात जोडून तो म्हणाला, "उपकार झाले महाराज ! बरे झाले ! पुरावा नष्ट झाला."

"कसला पुरावा ?'

"चोरीचा.'

"म्हणजे ? हे गुलाबजाबू चोरीचे का ? मघाशी जो आरडाओरड झाला तो चोर !"

"मीच !" खुल्या दिलाने त्याने गुन्हा कबूल केला

"कुठें कसा डल्ला मारलास तूं ?"

"काहीहि डल्ला मारला नाहीं. फक्त हे पाच गुलाबजाबू तेवढे चोरले. देवाशपथ यापेक्षा मी दुसऱ्या कशाचीहि चोरी केली नाही."

त्या माणसाच्या शब्दावर माझा विश्वास बसेना कारण, भुकेसाठी त्यानें मिठाई चोरली असती तर स्वत: न खाता ती मला दिली नसती.

मान खाली घालून तो म्हणाला, "माझी सारी हकीगत शांत चित्तानें ऐकून घ्या. म्हणजे तुम्हाला माझ्याबद्दल सहानभूती वाटेल."

"नाही, चोराबद्दल मला सहानुभूती वाटणार नाही. देशात दारिद्र्य आणि बेकारी आहे ही गोष्ट खरी, पण दुसरी पंचवार्षिक योजना पूर्ण होई-पर्यंत तुम्हीं चोरांनी धीर धरायला हवा"

"पण मी चोर नाहीच मुळी. आयुष्यात आज पहिल्यानेच चोरी केली आणि तीहि गुलाबजाबूची !" तो आपली माहिती पुढें सांगं लागला. "मी धंदेवाईक चोर नाही. माझं नाव बाजी [illegible] एक्स्ट्रा [illegible] नवरा आहे."

"काय ? एक्स्ट्रॉ नटीचा नवरा ?" मला एकदम त्याच्याविषयीं आदर वाटू लागला एका फिल्मी नटीचा नवरा माझ्या घरी यावा याचे मला मोठें भूषण वाटले.

सिगारेटचे पाकीट त्याच्या पुढ्यात धरून मी अदबीने म्हटले, "घ्या बाजीराव, मघापासून या नाही दिलीत तुमची ओळख ? किती साधे आहात तुम्हीं ! वाटत नाही नटीचा नवरा असाल ! कोण ती एक्स्ट्रा नटी तुमची ! तिच शुभ नाम काय ? सागा, नाव सागा !"

' मिस् सोनामुखी "

मी बुचकळ्यात पडलो "कोण बरे ही मिस् सोनामुखी ? छे ! कुठें पाहण्यात नाहीं की ऐकिवात नाही '

सिगारेटचा झुरका घेताना बाजीरावाना खोकला आला ते म्हणाले, "ही कॅप्स्टन मला चालत नाही मी फक्त चार मिनार ओढतो "

"माझाहि तोच ब्रँड आहे" मी त्याला पुष्टी दिली, "पण थोर पाहुण्यासाठीं कॅप्स्टनचे एक पाकीट मी नेहमी राखून ठेवतो म्हटल, आपण नटीचे नवरे !"

"कसचा नवरा नि कसची नटी !" बाजीराव कपाळ चोळीत म्हणाले "तशी ती फार मोठी नटी नाही आपली अशीच एक एक्स्ट्रॉ आजपर्यंत एकाच बोलपटात तिनें काम केले आहे 'दहींकाला' बोलपटात दहा वीस गोपींच्या ताड्यात तिला नदीवर पाणी भरण्याची भूमिका होती अस मस्त पाणी भरल म्हणता तिन ! प्रेक्षकाच्या हृदयाचे पाणी झाले !"

मला हुरहूर लागली मिस् सोनामुखीची भूमिका पाहण्याची सधि मला मिळाली नाही याबद्दल वाईट वाटले

बाजीराव पुढें सागू लागले, 'कपनीत सहा महिने शूटिंग चालल होत, पण त्या डायरेक्टरला एक वाईट खोड होती बघा तो रोज स्टुडिओत गुलाबजाबू घेऊन यायचा आणि सर्व नटीना ते वाटायचा "

' ही वाईट खोड कसली ? नटींना गुलाबजाबू देण्यात डायरेक्टरचा चागुलपणाच दिसून येतो "

माझे हे उद्‌गार बाजीरावाना आवडले नाहीत चिडल्यासारखें करून ते म्हणाले, "त्याच गुलाबजाबूचा परिणाम आज भोगावा लागतो आहे.

म्हणजे बघा, त्या कंपनीच दिवाळं वाजलं फिल्म कंपनी बंद पडली डायरेक्टर फरारी झाले आणि मिस् सोनामुखी बेकार झाली ती बेकार झाल्याबद्दल माझी विशेष तक्रार नाहीं पण तिला गुलाबजाबूची जी चटक लागली होती ती अजून कायम आहे रोजरोज हिला गुलाबजाबू मी कोठून आणून देऊ ? ऐकून घ्या मिस्टर, मी श्रीमंत माणूस नाही इकडे तिकडे काही धंदा करून आणि पैसे उसने काढून आम्ही कशीबशी गुजराण करतो पण तिला डायरेक्टरने सहा महिने सवय लावून ठेवली ती जाईल कशी ? काल रात्रीचीच गोष्ट बाई गुलाबजाबूसाठी हट्ट धरून बसली, आणि माझ्याजवळ तर दिडकी नाहीं काय करणार ! विचार केला कुठेंतरी डल्ला मारावा ! रात्रभर झोंप आली नाही मिस् सोनामुखी रुसली होती मला चिमटे काढीत होती पहाटें चार वाजता कपडे करून खाली उतरलो. जिकडे तिकडे सामसूम होतें दुकानें बंद होती माणसाची जाग नव्हती एखादें मिठाईचे दुकान कुठें दिसतें का, याचा शोध करीत ह्या बाजूला येऊन पोचलो 'वन्सीलाल मिठाईवाला' ही पाटी नजरेस पडली सुदैवाने दुकानाची एक फळी अर्धवट उघडी होती. एक भय्या दुधाचा हंडा घेऊन आंत शिरत होता त्याच्या मागोमाग मी गुपचूप दुकानात प्रवेश केला दारातच एका लोखंडी खुर्चीवर काहीं गुलाबजाबू दिसले ! म्हटले, देव पावला ! नेमकी हीच वस्तु सहजासहजीं माझ्या हाती लागावी म्हणजे काय ! मी पटक्न् ते गुलाबजाबू उचलले आणि झटकन् बाहेर सटकलो पण दुसऱ्याच क्षणात 'चोर चोर' अशी ओरड झाली अंधाराचा फायदा घेऊन मी पळत सुटलो आणि ह्या तुमच्या इमारतीत येऊन उडी मारली गुलाबजाबूचा पुडा रस्त्यात फेंकून देण्याचेहि मला भान उरले नाही, इतका मी घाबरून गेलो होतो. ते गुलाबजाबू तसेच खिशात राहिले तेंच तुम्हाला मी खावयास दिले. असो आता पुरावा नष्ट झाला आहे आणि माझ्या मागें लागलेली माणसेंहि निघून गेलीं आहेत."

बाजीरावाची ती हृदयद्रावक कहाणी ऐकून मला त्याच्याबद्दल खूपच सहानुभूति वाटली. आपल्या आवडत्या एक्स्ट्रॉ नटीबद्दलचे त्याचे प्रेम, त्याग धडाडी वगैरे गुणाची मी मनातल्या मनात तारीफ केली

इतक्यात दारावर 'टिक् टिक्' अशी टिचकी झाली बाजीराव घाबरला. मीहि जरा साशंक झालो.

"मी म्हादबा पाटीवाला," बाहेरून आवाज झाला. तो तर माझा नेहमीचाच दोस्त. आमच्या घरासमोरच फूटपाथवर झोंपत असतो आणि रोज पहाटें पांच वाजतां येऊन मला त्रास देतो.

हातांतला 'कोलडेली' चा अंक मला दाखवीत म्हादबा म्हणाला, "शेठ, आज काय आंकडा आलाय बघा!"

"पंजा," अंकावर नजर टाकीत मी उत्तर दिलें.

"वाटलंच मला!" म्हादबा खुशींत येऊन म्हणाला, "अहो, रात्रीं त्या मिठाईच्या दुकानांतून पांच गुलाबजाबू चोरीस गेले ना! पंजा येणारच. पण शेठ, तो चोर मरणार बघा नक्की. अहो, ते गुलाबजाबू उंदरासाठी विष घालून ठेवले होते. आता सागा तो चोर वाचणार कसा?"

"काय म्हणतोस? विष?" मी मूर्च्छितच पडलों! छाती धडधडूं लागली, चक्कर येऊं लागली आणि मला भडाभड उलटचा होऊं लागल्या.

सकाळी दहा वाजेपर्यंत मला सडकून ताप आला, पण गुलाबजाबूचें रहस्य बाहेर फोडण्याची सोय नव्हती.

माझ्या फॅमिली डॉक्टरने मला तपासलें आणि इन्फ्ल्यूची ही दुसरी साथ आहे असें निदान करून मला इंजेक्शन दिलें. तीन चार दिवस औषधोपचार केल्यावर मी पूर्ण बरा झालों.

आज सकाळीं मिस्टर बाजीराव मला भेटण्यासाठी मुद्दाम आले. बरोबर मिस् सोनामुखीहि होती. बाजीराव माझे आभार मानीत म्हणाले, "तुमच्यामुळें माझी सोनामुखी वाचली. तिनें जर गुलाबजांबू खाल्ले असते तर तिचा निकालच लागला असता. तुम्ही वर्तमनपत्रवाले म्हणून हें विष पचविलें."

मिस् सोनामुखीच्या डोळ्यांतहि कृतज्ञतेचा गोड भाव दिसून आला!

□□□

# दे. भ. धोकाराम ह्याची मुलाखत

(सुप्रसिद्ध समाजसेवक दे भ धोकाराम ह्याच्या वयाला नुकतेच ५१ वे वर्ष लागले *या वाढदिवसानिमित्त एका वर्तमानपत्राच्या प्रतिनिधीने* त्याची खास मुलाखत घेतली )

प्रतिनिधी–राम राम धोकाराम

धोकाराम–या बसा ! आपण कोण ?

प्रतिनिधी– मी वर्तमानपत्रवाला आहे आपल्या वयाला पन्नास वर्षे पुरी झाली हें समजले आनंद झाला आपल अभिनंदन करण्यासाठीं मी आलों आहे धोकाराम आमच्या दिवाळी अंकासाठीं आपण एक मुलाखत देण्याची मेहेरबानी कराल काय ?

धोकाराम– जरूर ! तुम्हाला मुलाखत देणार नाही तर कोणाला ? विचारा ! प्रश्न विचारा !

प्रतिनिधी– मिस्टर धोकाराम, तुम्हाला 'धोकाराम' हें नाव कस पडल ? हें तुमच खर नाव दिसत नाही

धोकाराम– खर आहे हें नाव पाळण्यातल नाही माझ खर नांव आहे सखाराम पण मी लोकाना धोका देतो म्हणून माझ नाव धोकाराम पडल आहे

प्रतिनिधी– ही अभिमानाची गोष्ट आहे आपल्या कर्तबगारीचा हा गौरव म्हटला पाहिजे धोकाराम, आपण आजपर्यंत कुणकुणाला धोका दिला तें सांगू शकाल काय ?

घोकाराम– काय, काय म्हणून सांगूं ! आयुष्यांत मी इतक्या लोकाना धोका दिला आहे कीं ती सगळी यादी लक्षांत कशी राहील ? जगाला धोका देण्यांतच माझा सारा जन्म गेला.

प्रतिनिधी– पण काही ठळक धोके तुमच्या आठवणीत असतीलच.

घोकाराम– हो ! तरुणपणीं मी पहिल्यानें धोका दिला तो एका गरीब सुंदर मुलीला. तिच्याशीं मी प्रेमाचं नाटक केलं आणि लग्नाचं वचन देऊन अखेर तिला फसवलं ! ती आता वेडी होऊन गावांत भटकत आहे, यावरून हा धोका केवढा भयंकर होता; याची तुम्हांला कल्पना येईलच.

प्रतिनिधी– आपल्या कर्तृत्वाची सुरुवात एका बाईपासून झाली, ही भूषणावह गोष्ट. पण काय हो घोकाराम एकाच बाईला धोका देऊन आपण थांबलात काय ?

घोकाराम– असं कस होईल ? एक धोका पचला की दुसरा देण्याची स्फूर्ति येणारच. मी माझें कार्य पुढें चालू ठेवलें. दुसऱ्या एका श्रीमंत बाईचा मी बळी घेतला. हुंड्यावर नजर ठेवून मी तिच्याशीं लग्न केलं आणि नंतर तिला टाकून मोकळा झालों ! पुन्हा तिसरी भेटली, तिलाहि दगा देऊन कृतार्थ झालों.

प्रतिनिधी– वा ! आपल्या धोक्याच सत्र वाढत गेलं म्हणायच !

घोकाराम– नंतर मी माझ्या मित्राना धोका देण्यास सुरुवात केली. मित्रानें उदारपणें मला आपल्या घरी आश्रय दिला होता. एक दिवस त्याच्या गैरहजेरींत घरातल्या चीजवस्तू घेऊन मी पसार झालों.

प्रतिनिधी– छान ! उपकाराची चांगलीच फेड केलीत !

घोकाराम– नाहींतर मी घोकाराम कसला ? दुसऱ्या एका बेकार मित्राला नोकरी देतों अशा थापा मारून त्याच्याकडून वेळोवेळी पैसे उपटले. अशा प्रकारें दहा–बारा मित्रांना मी धोका दिला.

प्रतिनिधी– शाबास ! मित्राना धोका देणें हें खऱ्या सज्जनाचें लक्षण ! शत्रूंना कोणीहि धोका देईल, पण मित्रांना धोका देण्यास फार मोठं मनोधैर्य लागत.

घोकाराम– हे गुण माझ्या अंगीं आहेतच. माझ्या पवित्र सहवासांत

जो आला, त्याला धोका मिळालाच म्हणून समजा !

प्रतिनिधी– म्हणजे ! तुम्ही मलाहि धोका देणार का ?

धोकाराम– तुम्ही माझ्याकडे वरचेवर येत–जात रहा, म्हणजे तुम्हालाहि याची प्रचीति येईल

प्रतिनिधी– आपण व्यापारधंदा वगैरे केला कीं नाहीं ?

धोकाराम– व्यापार केल्याशिवाय कसा राहीन ? धोका देण्याला व्यापारासारख क्षेत्र नाही आयुष्यात मी खूप धंदे केले, म्हणजे उद्योगधंदे केले !

प्रतिनिधी– आपल्या उद्योधंद्याची काही करामत सांगा पाहू

धोकाराम– गिऱ्हाइकाना धोका देणें हीच माझ्या धंद्याची खरी करामत पहिल्याने भेसळ तुपाचा धंदा करून मी लोकाना धोका दिला नतर औषध विक्रेता म्हणून बनावट औषधाचा व्यवहार केला माझ्या बनावट औषधानी काही रोगी थेट स्वर्गांत जाऊन पोचले ईश्वर त्यांच्या आत्म्यास शांति देवो

प्रतिनिधी– याबद्दल सरकारकडून आपल्याला काही बक्षीस वगैरे !

धोकाराम– पोलिसानाहि धोका देण्याचा मी खूप प्रयत्न केला, तरीसुद्धा तीन वर्षांचा तुरुगवास भोगून मी आलो

प्रतिनिधी– तुरुगातून सुटल्यानतर तरी आपण सुधारण्याचा प्रयत्न केला काय ?

धोकाराम्– कोडगा माणूस काय सुधारणार हो ? तुरुगातून सुटल्यानतर मी सरळ खादीचे कपडे अगात चढविले राजकारणात पडण्याचे मी ठरविले या क्षेत्रात मी झपाट्यानें प्रगती करू शकलों धोक्याचे राजकारण सुरू करून मी बरीच देशसेवा केली निवडणुकाहि जिंकल्या मतदाराना आश्वासन देऊन नतर धोका देण्याचे तत्र मला पूर्ण अवगत आहे

प्रतिनिधी– धन्य तुमची धोकाराम, जगाला धोका देण्याची ही तुमची सवय जन्मात जाणार नाहीं का ?

धोकाराम– मी केवळ माणसानाच धोका देतो अस समजू नका. अहो, देवालासुद्धा मी धोका दिला आहे

प्रतिनिधी– परमेश्वराला तुम्ही कसा काय धोका देऊ शकला ?

धोकाराम– तेच सांगतो मध्यंतरी मी भगवी कफनी धारण करून साधू बनलो होतो. शिष्य-शिष्यिणी जमवून चागलाच थाट केला. वरून मी साधूपणाचा आव आणला खरा, पण माझी नजर होती द्रव्यावर आणि स्वार्थावर. म्हणजे बघा, या धोकारामाने देवाधर्माचे सोंग करून देवानासुद्धा धोका दिला.

प्रतिनिधी– कमाल केलीत तुम्ही ! तुमची ही उद्बोधक मुलाखत आमच्या खास अंकात प्रसिद्ध करतो. वाचकापुढे हा धोक्याचा कंदील ठेवला तर ते तेवढेच सावध राहतील

धोकाराम– तुमच्या वर्तमानपत्राचा वर्गणीदार म्हणून माझे नाव नोंदा.

प्रतिनिधी– नको वर्गणी बुडवून तुम्ही आम्हालाच धोका द्याल. बर, येतो ! राम राम धोकाराम !

□□□

# चुंबन—कर

(स्थळ . मलबार हिलवरील लताकुंज पात्रें : मालती आणि माधव)

मालती— इश्श ! सोडा मला !

माधव— का सोडू ?

मालती— टॅक्स पडेल

माधव— कसला टॅक्स ?

मालती— माहीत नाही का ? चुंबनावर टॅक्स बसविला आहे म्हणे !

माधव— कुणी सांगितलं तुला ?

मालती— काँग्रेस हाऊसमध्यें कळलं तिकडे अर्थमंत्र्याच्या बजेटवर चर्चा चालू होती तरुण–तरुणींच्या चुंबनावर म्हणे कर बसविला आहे !

माधव— अरेरे ! दिल्लीच्या अर्थसंकल्पाने आमच्या प्रेमसंकल्पावर आक्रमण करावं ना ? काय ग ? किती टॅक्स आहे चुंबनाला ?

मालती— पहिल्या एका चुंबनाला म्हणे एक नया पैसा. आणि नंतरच्या प्रत्येक चुंबनाला दोन नयें पैसे !

माधव— बापरे ! म्हणजे आपल्याला बराच टॅक्स पडेल

मालती— म्हणून म्हणते, जरा दूर सरा. असा लघळपणा करू नका गडे.

पद

हा, मदगा लावू नका कर
दूर सरा, तुम्ही दूर सरा।
उगा कशाला टॅक्स भरा ।।

माधव— करवाढीची भीति नसे मज, प्रेमवीर मी असे खरा । ये ग लाडके जवळ जरा ।।

मालती– काटकसरीचे लक्षण नाही काय म्हणावे अशा नरा। जाऊ चला आपुल्या घरा ॥

(काही वेळ संगीत चालल्यावर मग संवाद सुरू होतो)

मालती– पुरे गडे आता! अधार पडू लागला!

माधव– मग आत्ताच तर खरी मजा आहे अंधार केंव्हा पडतोय याची मी वाटच पहात होतो

मालती– पण टॅक्स वाढत जाईल ना? आपली ऐपत नको का टॅक्स भरायची?

माधव– राष्ट्रासाठी थोडी कळ सोसली पाहिजे आज सरकारला निरनिराळ्या विकास योजनासाठी पैशाची फार जरुरी आहे

मालती– खरंच! आपल्या चुंबनकरामुळें सरकारी तिजोरीत केवढी मोठी भर पडणार! इश्श! हें काय! पाहतील ना कुणीतरी!

माधव– पाहू देत आपल्याला काय चोरटा व्यवहार करून कर चुकवायचा नाही आपला हिशोब उघड उघड असणार!

मालती– अहाहा! काय गार हवा आहे इथे नाही?

माधव– ही वसली हवा? लग्नानतर आपण हनीमूनसाठी माथेरानला जाऊ, तिथली हवा बघ!

मालती– पण हनीमूनला फार टॅक्स आहे हो!

माधव– कुणी सागितल तुला?

मालती– माझी एक अविवाहित मैत्रिण म्हणत होती ह्या कराच्या भीतीने बिचारी लग्नावाचून कुढत आहे ती माझ्याजवळ रडगाणे गात होती

पद

कधि करिती लग्न माझें
तुज ठावे ईश्वरा।
वाढला टॅक्स हा किती
त्यास ना मिती
पळाला पती
मागल्या दारा, तुज ठावे ईश्वरा ॥
चुंबनावरी ते कर
मधुचंद्रावरती कर
संसार सुखावर कर
कराचा मारा, तुज ठावे ईश्वरा ॥

:

# फरारी पुढारी

'गाव तेथें पुढारी' ही म्हण उधार गांवाला आतां लागूं नव्हती. उधार गावचा एकुलता पुढारी गाव सोडून निघून गेला होता. दे. भ. सटवाजीराव साटेलोटे हे तसे भले गृहस्थ होते. पुढारीपणाला लागणारे सारे गुण त्याच्या अगी होते. उधारगावांतला एकमेव पुढारी म्हणून त्यांना प्रतिष्ठा होती. गावात त्याच्याशिवाय सभा होत नसे. सभेंत त्याच्याखेरीज भाषण करणारा दुसरा वक्ता नव्हता. तेच अध्यक्ष, तेच वक्ते !

बरेच दिवस सटवाजीवर उधार गावात गुण्यागोविंदाने नादले, पण पुढे काळ फिरला पुढारी आणि गाववाले ह्यांच्यात मतभेद निर्माण झाले. वैमनस्य वाढत गेलें. सटवाजीरावाचें आणि उधारगावच्या लोकाचें पटेना; आणि एक दिवस सटवाजीराव गाव सोडून गुपचूप पसार झाले.

तेव्हापासून उधारगावची शान खतम झाली. रुबाब नष्ट झाला. गाव पोरका झाला. नेतृत्वहीन झाला लोक हवालदिल झाले. पुढारी नसतांना कसें जगावें ही त्याना चिंता पडली. एवढया मोठया गावात एकहि पुढारी नसावा याची गाववाल्यांना लाज वाटू लागली. पुढारी नसलेला गांव म्हणून उधारगावाची दुष्कीर्ति होईल अशा समजुतीनें सारेजण हळहळूं लागले.

ईश्वरकृपेनें उधारगावाला कशाची कमतरता नव्हती. पाऊस चांगला पडत होता, पीकपाणी उदंड होतें, सर्व काहीं ठीक होतें. म्हशी भरपूर दूध देत होत्या. बैल आनंदी होते. वयात आलेल्या स्त्री-पुरुषाचीं लग्नें होत होतीं. लग्नानंतर मुले होत होतीं. काय कमी होतें उधारगावाला ? एकच कमी ! पुढारी नव्हता. जो एकुलता एक पुढारी होता, तो बेपत्ता झाला होता.

फरारी झाला होता पुढारी नसलेला गाव म्हणजे तो काय गाव झाला ? नाक नसलेला चेहरा म्हणजे तो काय चेहरा झाला ? घरास बायको नाहीं, रानात वाघ नाही आणि गावात पुढारी नाही, याला काय अर्थ आहे !

ईश्वरकृपेने उधारगावाला एक डॉक्टर होता एक वकील होता एक काळाबाजारवाला होता एक चोर होता एक हातभट्टीवालाहि होता पण पुढारी तेवढा नव्हता सर्व काही आहे, पण पुढारी नाहीं, याचे दुःख कुठल्या गावाला होणार नाही ? षड्रस अन्न राधले आहे, पण मीठ नाही, दिवाळी अंकात उत्तमोत्तम लेख आहेत, पण तीन रंगी कव्हर नाहीं, तर शोभा काय!

गावाला पुढारी नाही ह्या दुःखाने आबाजी अवचट आजारी पडले. खाशाराव खवचट क्षुरणीम लागले तात्याजी तिरसट ह्यांनी अन्नपाणी सोडले आणि त्यामुळे त्यांचे वीस पौन्ड वजन घटले कुशाबा खुसपटे हे संसार सोडून सन्यास घेण्याचा विचार करू लागले गावातील मुलांनीहि विटीदांडूचा खेळ सोडून दिला

गावाला पुढारी नाही, ही गोष्ट जनावरांतहि जाणवू लागली गोठयात गाई हुबरू लागल्या बैलांनी चारापाणी वर्ज्य केले म्हशी पूर्वीप्रमाणे दूध देईनात कोंबड्या कमी कमी अंडी घालू लागल्या मांजराचे लक्ष उंदरावरून साफ उडाले कुत्र्यांच्या भुंकण्यात तर मुळीच दम नव्हता

गाव सोडून पळून गेलेला आपला पुढारी आज येईल, उद्या येईल, म्हणून लोकांनी वाट पाहिली वर्ष दिड वर्ष लोकांनी वाट पाहिली, पण वर्ष दीड वर्ष झाले तरी पुढारी परत येण्याचे लक्षण दिसेना !

आबाजी अवचट तापाने कण्हत म्हणाले, "खाशाराव पुढारी आल्याशिवाय मी या आजारातून बरा होण्याची आशा नाही. हा ताप इन्फ्ल्यूवर जाण्याचा धोका आहे, असे डॉक्टर म्हणतात "

"खरं आहे तुझं म्हणणं !" खाशाराव क्षीण आवाजात उत्तरले. "सारा गाव बेजार झाला आहे पुढारी नाहीं तर जगायचं कसं माणसानीं ? त्या सटवाजीरावाना थोडे का निरोप धाडले ? गावचा पाटीलसुद्धा त्याना भेटून आला, पण ते सटवाजीराव दाद देत नाहीत."

"ते परत येत नसतील तर दुसरा उपाय केला पाहिजे. आपण

सटवाजीरावाना एक शेवटची नोटीस पाठवू, आणि ते नाहींच आले तर दुसरा पुढारी करू गावाला पुढारी पाहिजेच"

वराच विचारविनिमय करून उधारगावच्या मडळीनी दे भ. सटवाजीराव ह्याना एक नोटीस पाठविली नोटीस पुढीलप्रमाणे होती–

## जाहीर नोटीस

दे भ सटवाजी साटेलोटे हल्लीं राहणार खिरापत, बेकारनगद ह्यास खाली निशाणी आगठा करणारे उधारगाव (बुद्रुक) नागरिकाकडून अशी नोटीस देण्यात येते की,

तुम्ही आमच्या उधारगावचे पुढारी असून गेले वर्ष दीड वर्ष गाव सोडून फरारी आहात तुमचा आम्ही खूप तपास केला तुमचा शोध लावण्यासाठीं गावातल्या एका दोघानी हिंदुस्थानात ठिकठिकाणी प्रवास केला दौरे काढले त्यासाठी आम्हाला पाच हजार रुपये खर्च आला शेवटीं तुम्हीं खिरापतवाडीत गुपचूप वावरत आहात असे कळते

तुम्ही गाव सोडून गेल्यामुळे आमचे पुढारीपण करणारा कोणी उरला नाही सार्वजनिक कार्यांत खड पडला आहे सभा, भाषणे बद झाली आहेत आमच्या सार्वजनिक जीवनातला आनद नष्ट झाला आहे

तुम्ही आमच्या गावी परत नादण्यास यावे म्हणून आम्ही खूप खटपट केली विनतीपत्रे धाडली गावचे तीन प्रतिनिधी तुमच्या भेटीस गेले, पण तुम्ही पुन्हा गावात येण्यास तयार नाही. आमच्या प्रतिनिधीना तुम्ही आणि तुमच्या आप्तमडळीनी मारहाण केली, शिवीगाळ केली आणि त्याना धक्के मारून हाकलून दिले

तरी ही नोटीस मिळाल्यापासून आठ दिवसाचे आत तुम्ही गावात परत नादण्यास यावे तस न केल्यास आम्हीं गावच्या रिवाजाप्रमाणे दुसरा पुढारी करू मग आमच्यावर तुमचा पुढारीपणाचा काहीं हक्क रहाणार नाहीं.

तसेच तुम्हीं गाव सोडून जाताना आपल्यावरोवर गावातील बऱ्याच चीजवस्तू नेल्या आहेत कुणाची वळकटी, कुणाची छत्री, कुणाचे घोंगडे वगैरे माल तुम्ही पसार केला आहे त्याचप्रमाणे गावातील होलिका उत्सव

फडाची बरीच वर्गणी तुमच्याकडेच आहे हा हिशेब चुकता करून तसेच तुमच्या शोधासाठीं गावकऱ्यांना झालेला प्रवास-खर्च रुपये पाच हजार भरपाई करून आठ दिवसाचे आंत नादण्यास यावे आठ दिवस वाट पाहून मग आम्ही आमच्या सार्वजनिक ससारसुखासाठी दुसऱ्या पुढाऱ्याशीं सोयरीक करणार. मग तुम्हास आमच्याकडे पोटगी वगैरे मागण्याचा हक्क नाहीं हें लक्षात घ्यावे.

कळावे, आपले

( *निशाणी आगठा* )

१ *आबाजी अवचट* २. *खाशाराव खवचट*

३. *कुशाबा खुसपटे* ४ *तात्याजी तिरसट*

( उधारगाव बुद्रुकची गावकरी मडळी)

* * *

## नोटिशीला उत्तर

श्री आबाजी अवचट, खाशाराव खवचट इत्यादि उधारगावच्या गावकरी मडळीस, खाली सही करणार दे भ सटवाजी साटेलोटे याजकडून नोटीस देण्यात येते कीं —

तुम्ही माझ्यावर केलेले आरोप साफ खाटे आणि खोडसाळ आहेत मी आपण होऊन स्वखुषीने गाव सोडून पळालो नाहीं, तर तुम्हीच मला व्यासपीठाकडून हाकलून लावले तुमच्या जाचाला कटाळून मी ह्या खिरापतवाडींत आसरा घेतला आहे

चार वर्षांपूर्वी तुमच्या उधारगावात सन्मान्य पुढारी ह्या नात्याने मी नादावयास आलों सुमारे दोन वर्षे मी सुखानें ससार केला पण पुढें गावकऱ्याची चालचलणूक बिघडली वाईट सगतीच्या नादाने तुम्ही माझा छळ करण्यास सुरवात केली माझ्या जाहीर सभेंत गुडगिरी होऊ लागली. माझे भाषण कुणी ऐकून घेईनात तुम्हीं मला काळे बावटे दाखवून माझी शोभा केली माझ्या सभेवर कादे-बटाटयाचा वर्षाव होऊ लागला धक्काबुक्कीचा प्रसाद मिळू लागला गावातल्या पोरासोरानी आणि टवाळखोरानी माझा धिक्कार आणि उपहास केला. तुम्ही माझें नेतृत्व झुगारून दिलें साऱ्या

गावात माझी अप्रतिष्ठा झाली. अशा परिस्थितीत गावात पुढारी म्हणून नादणें मला अगदीच अशक्य झालें तुमच्या छळामुळें मला उधारगाव सोडून खिरापतवाडीत मुक्काम ठोकावा लागला 'माझ्या पलायनाला तुम्हीच जबाबदार आहात.

मी माझ्यावरोबर तुमची काहीहि चिजवस्तू आणली नाही. एका वस्त्रानिशी मी व्यासपीठाकडून पळून आलों. डोक्यावर टोपीसुद्धा नव्हती !

मी पुन्हा तुमच्याकडे येऊन नादावयास तयार आहे. तरी ही नोटीस मिळाल्यापासून आठ दिवसाचे आत चागल्या वर्तणुकीचा जामीन देऊन व चार सभ्य लोकाना साक्ष ठेवून मला घेऊन जावें.

गेल्या दीड वर्षात मला सावकाराचें तीन हजार रुपये कर्ज झाले आहे. उधारगाव सोडल्यापासून मी बेकार आहे. चरितार्थाचे साधन नाही. कर्ज काढून गुजराण करतो. सबब मला झालेले तीन हजार रुपये कर्ज व्याजासकट ताबडतोब फेडावे तसेच मधल्या काळात मला जो मनस्ताप झाला त्याबद्दल नुकसानभरपाई म्हणून आणखी दोन हजार रुपये मला द्यावे.

उधारगांवचे काहीं प्रतिनिधी माझें मन वळविण्यास आले असता मी त्याना मारहाण केली, असा जो तुमचा आरोप आहे तो सपूर्ण बनावट आहे. उलट त्यानीच माझ्या दारात येऊन निदर्शने केली व घोषणा करून मला भडावून सोडले गुडगिरीचे हिडीस प्रदर्शन केले

तरी ह्यापुढे तुमच्याकडून माझा अपमान होणार नाही असे आश्वासन द्यावें, माझें कर्ज फेडावे आणि चागल्या वर्तणुकीचा जामीन देऊन मला नादविण्यास घेऊन जावें

मी अजून तरुण आहे. सार्वजनिक कार्याची हौस अजून फिटली नाहीं. तुम्ही तिकडे सारे गावकरी मजा करीत असताना, मी इकडे अज्ञातवासात एकाकी जीवन कंठू शकत नाही. तरी ही नोटीस मिळाल्यापासून आठ दिवसाच्या आत तुमच्याकडून समाधानकारक उत्तर न आल्यास मी माझ्या सार्वजनिक सुखासाठी दुसरा घरठाव करीन. मग माझ्यावर तुमचा काहीहि हक्क चालणार नाहीं. कळावें.

आपला

सटवाजी सारटेलोटे, हल्ली मुक्काम–खिरापतवाडी.

(सटवाजीरावाकडून आलेल्या उत्तराचा विचार करण्यासाठी उधार-गावच्या नागरिकांची सभा भरली आहे )

आबाजी–आता कस कराव मंडळी ! सटवाजीरावाकडून हें असं उत्तर आल आहे आम्ही म्हणे त्याच कर्ज फेडाव, नुकसानभरपाई द्यावी !

दाशाराव–दमडा मिळणार नाही इतके पैसे पुढाऱ्याला देण्यापेक्षा ग्रामविकासाच्या कार्याला खर्च करू

आबाजी–आणि म्हणे आम्हीं चांगल्या वर्तणुकीचा जामीन दिला पाहिजे !

तात्याजी–चोराच्या उलटचा म्हणतात त्या ह्याला ! उलट ह्या पुढाऱ्यानेच आम्हाला चांगल्या वर्तणुकीचा जामीन द्यायला हवा ! सट-वाजीरावाची चालचलणूक बिघडली म्हणूनच सभेत त्याला काळे बावटे मिळाले ना ? निदर्शने झाली ना ?

कुशाबा–पुढाऱ्याने अगदीच ताळतंत्र सोडून कस चालेल ? लोक-मताची पर्वा न करणारा आणि लोकहिताच्या विरुद्ध वागणारा पुढारी गावात कसा टिकेल ? सटवाजीरावाना गाव सोडून पळून जाव लागल, ह्या आमचा दोष नाही त्याच्याच कर्माचे फळ ते ?

आबाजी–चोर लोकांचा कैवार आणि गावातल्या गरीब लोकांशीं बेइमानी ! सटवाजीराव आमचे पुढारी म्हणून आम्हीं त्याचे खूप लाड केले मोटार घेऊन दिली बंगला बांधून दिला, पण शेवटी हा आमच्या-वरच उलटला स्वार्थासाठी साऱ्या गावाला धोका !

दाशाराव–आमचा गुन्हा काय तर आमचा गाव आमच्याकडेच असावा, ही मागणी ! शेजारचा चोरगाव आणि आमचा उधारगाव एकत्र जाहून भेसळ करण्याची जी योजना चालू आहे, तिला आम्हीं विरोध केला आम्हीं का म्हणून चोरात सामील व्हावे ? चोराचा आणि आमचा संबंध काय ?

तात्याजी–अशा वेळी आपल्याच पुढाऱ्यान चोराची बाजू घ्यावी हे केवढं दुर्दैव ! सटवाजीरावाना आमच्यापेक्षा परगावच्या चोराचीच जास्त मातब्बरी वाटू लागावी ! चोराचा फायदा करावयास ते निघाले ! आणि गाव सोडून त्याना परागंदा व्हावे लागले !

कुशाबा– सटवाजीराव आता पुन्हा काय तोंड घेऊन येतील! गावात त्याची पत राहिली नाही. राहू द्या त्याना खिरापतवाडीतच! या पुढं फार आग्रह नको!

आबाजी– पण आता दुसरा पुढारी कोण करावा?

खाशाराव– पुढारी नकोच! कशाला हवा पुढारी? पुढाऱ्याचा आपल्याला वाईट अनुभव आहे. पुढारी केव्हा दगा देईल ह्याचा नेम नसतो आपल्या उधारगांवाला यापुढे बिलकुल पुढारी नको! पुढाऱ्यावाचून लोकाचे काही अडत नसते. पुढाऱ्याचे मात्र लोकावाचून अडतें

आबाजी– चला तर मंडळी! गाववाल्याचा निर्णय ठरला! पुढारी नको! आमचे आम्हीं पाहून घेऊ पुढारी नसलेला आदर्श गाव म्हणून उधारगावचा लौकिक होईल.

□□□

## स्वर्गवासी फिल्म कंपनी : ११

एकदा स्वर्गलोकात देवेंद्राचा दरबार भरला असता नारदमुनींची स्वारी त्या ठिकाणी आली नारदाचे आदरपूर्वक स्वागत करून इंद्र म्हणाला, " मुनिमहाराज, आपण त्रिखंडात संचार करता ! नवीन काय बातमी आहे ? पृथ्वीलोकातील मानव मंगळावर स्वारी करणार होते त्याचे काय झाले ? सूर्य बिंबावर स्फोट होऊन किती नवीन ग्रहगोल निर्माण झाले ? चंद्रमंडळावर रहस्यमय तबकड्या दिसतात म्हणे, ही काय भानगड आहे ?"

देवेंद्राचे सवाल ऐकून नारदमुनी गालातल्या गालात हसले. चिपळ्या वाजवून 'नारायण ! नारायण !' असा त्यांनी त्रिवार जयजयकार केला. नंतर ते म्हणाले, "हे सुरपते, काय प्रश्न विचारतोस मला ? असल्या क्षुल्लक आणि मामुली बातम्या सांगण्यासाठी का आलो मी इथे ? विश्वात यापेक्षाहि विशेष महत्वाच्या घडामोडी चालू आहेत याची कल्पना आहे का, तुला ? इंद्रा, तू आहेस कुठें ? तुला काय माहिती आहे ?"

" सांगा मुनिवर्य, सांगा ! ती अद्भुत वार्ता कृपा करून सांगा !"

" नाहीं, ती बातमी सांगितली तर वाईट वाटेल तुला !"

" मी ऐकून घ्यायला तयार आहे " देवेंद्राने हट्टच धरला

नारदमुनी गंभीर होऊन म्हणाले, " राजेश्वरा, काय सांगू तुला ! तू अमरपुरीचा राजा खरा, तेहत्तीस कोटी देवाचा स्वामी तू ! तुझ्याजवळ ऐश्वर्य आहे, वैभव आहे, सुंदर अप्सरा आहेत, कुबेर तुझा खजिदार आहे, बृहस्पती, वाचस्पती वगैरे विद्वान पंडित तुझ्या दरबारात आहेत, पण उपयोग काय ? तुझ्याजवळ एक गोष्ट कमी आहे "

"हें शक्य नाहीं माझ्यापाशी नाहीं अशी एकतरी वस्तू चराचर सृष्टीत आहे काय ? नारदमुने अशी एकहि गोष्ट अखिल विश्वात नाही की जी माझ्याजवळ नाही "

"हा तुझा भ्रम आहे" नारद आवाज चढवून म्हणाले," इंद्रा, तुझ्या राज्यात फिल्म कंपनी कुठें आहे ? चित्रपट कुठें आहेत ? एक तरी सिनेमा कधी लागला का इथें ? नाहीतर पृथ्वीतलावर पहा ! काय धूमधडाक्यानें चित्रपट चालू आहेत ! काय बेफाम फिल्म कंपन्या आहेत ! काय एकापेक्षा एक अवाढव्य स्टुडिओ आहेत ! धन्य ते पृथ्वीवरील मानव आणि धन्य त्याचा सिनेमा प्रत्येक थिएटर हाऊस फुल्ल ! मी स्वत दोन तास रांगेंत उभा राहून मोठ्या मुष्किलीने तिकीट मिळवल"

नारदाचे हे बोल ऐकून देवेंद्र खजील झाला मृत्युलोकातील मानवानी स्वर्गलोकावर ताण करावी ह्याची त्याला लाज वाटली

थोडा वेळ विचार करून इंद्रदेव म्हणाला "मुनिमहाराज, माझ्या राज्यात तेवढ एक कमी आहे खरे पण ती उणीव भरून काढण मला मुळीच कठीण नाही. मी स्वत एक फिल्म कंपनी सहज काढू शकेन आमच्या स्वर्ग लोकात चित्रपट सुरू केल्याशिवाय मी स्वस्थ बसणार नाहीं त्या मृत्यु लोकातील नट, नटी आणि सिनेमावाल्याची माझ्याजवळ बढाई सागू नका जोपर्यंत मी या धंद्यात लक्ष घातले नाही, तोपर्यंत त्याच्या गमजा !"

इंद्राचा निश्चय ठाम झाला नारदमुनी खुष होऊन म्हणाले, "बर झाल ! आता सिनेमासाठी पृथ्वीवर पुन्हा पुन्हा हेलपाटा घालण्याचा प्रसग टळला"

"महाराज, यापुढें मुळीच काळजी करू नका तुम्हाला स्वर्गीतल्या स्वर्गांत मी सिनेमा दाखवीन त्या पृथ्वीलोकातल्या सिनेमापेक्षा आमचे सिनेमा शतपटीनें सरस असतील मला काय कमी आहे ? माझ्याजवळ वाटेल तेवढें भांडवल आहे वाटेल तेवढ्या नटी आहेत वाटेल ती साधन-सामुग्री आहे अमरपुरीचा मी वैभवशाली सम्राट आहे कुबेर माझा अर्थ-मंत्री आहे बृहस्पती माझा शिक्षणमंत्री आहे धन्वंतरी आरोग्यमंत्री आहे !"

इंद्रदेवाची बडबड चालूच होती नारद तेथून केव्हा अदृष्य झाले तें त्याना कळलेंहि नाहीं.

देवेंद्रानें कुबेराना आज्ञा दिली, "कोषाध्यक्ष, तुम्ही आता भांडवलाचा बंदोबस्त करा. बृहस्पती गुरुदेवाना कथानक लिहायला सांगा. रंभा, उर्वशी, मेनका वगैरे अप्सराना वर्दी देऊन ठेवा. दिग्दर्शनाची जबाबदारी मी स्वतः घेतो."

आणि पुढील जाहिराती जिकडे तिकडे फडकू लागल्या

येणार ! येणार !
स्वर्गवासी फिल्म कंपनीचा
पहिलाच नवा बोलपट
'अरण्यरुदन'
लौकरच रुपेरी पडद्यावर येणार !
शूटिंग धुमधडाक्यात सुरू.
दिग्दर्शक इंद्रदेव, संगीत नारदमुनी
कथा संवाद: बृहस्पती
**प्रमुख भूमिका**
मेनका, उर्वशी, चित्रसेन गंधर्व,
कामदेव, वामदेव इत्यादि
ख्यातनाम नर्तिकांचे दिलखेचक नृत्य
भव्य सीनसिनरी, नेत्रदीपक सजावट,
ॲडव्हान्स बुकिंग चालू

बोलपटाचे चित्रीकरण झपाट्यानं सुरू झाले आणि लौकरच तो तयार होऊन स्वर्गांतील एका थिएटरात झळकला. देवानीं काढलेला पहिलाच बोलपट असल्यामुळें प्रेक्षकांचे कुतूहल फारच वाढले होतें.

चित्रगुप्त यांच्या संपादकत्वाखालीं निघणाऱ्या 'देवदूत' वर्तमानपत्रात या बोलपटासंबंधी पुढील अभिप्राय प्रसिद्ध झाला—

इंद्रदेवाचा भिकार बोलपट !
प्रेक्षकांची भयंकर निराशा !

'स्वर्गवासी फिल्म कंपनी' चा पहिलाच बोलपट 'अरण्यरुदन' येथील यमपुरी थिएटरात काल प्रकाशित झाला. बोलपटाचा प्रकाशन-समारंभ

ब्रह्मदेव यांच्या हस्ते मोठ्या थाटामाटाने साजरा झाला. ह्या प्रसंगी खास आमंत्रणावरून शंकर, पार्वती, विष्णू, लक्ष्मी, गणपती, सरस्वती, वरुण, अग्नि, यम, वशिष्ठ, विश्वामित्र, वाल्मिकी, व्यास वगैरे मोठमोठे देव आणि ऋषि उपस्थित होते निर्माता-दिग्दर्शक इंद्रदेव सर्व पाहुण्यांचे स्वागत करीत होते कथालेखक बृहस्पति, म्यूझिक डायरेक्टर नारदमुनी, चित्रतारका मेनका, उर्वशी इत्यादि कलाकार आणि शेंकडो प्रेक्षक ह्यांनी थिएटर फुलून गेले होतें

पण कळविण्यास वाईट वाटते की, हा एवढा गाजावाजा करून काढलेला बोलपट साफ पडला मोठ्या अपेक्षा बाळगून आलेल्या प्रेक्षकांची घोर निराशा झाली पृथ्वीलोकांतसुद्धा इतका दरिद्री चित्रपट निघत नसेल दिग्दर्शक इंद्रदेवाने मुंबईंत जाऊन एखाद्या स्टुडिओत असिस्टंट डायरेक्टरची नोकरी करावी आणि चित्रपट-कलेचा अनुभव घ्यावा त्याशिवाय उगीच अशा फंदात पडून स्वत ची आणि इतर देवगणाची बेअब्रू करू नये. 'अरण्य रुदन'चे कथानक तर इतके दुबळें आणि रडवे आहे की बोलण्याची सोय नाही अशी कमजोर आणि कंटाळवाणी कथा बृहस्पतीसारख्या श्रेष्ठ गुरुदेवांनी लिहावी ही केवढी नामुष्कीची गोष्ट ! कथालेखक बृहस्पति हे इतर क्षेत्रांत कितीहि तज्ञ असले तरी चित्रपटाची कथा लिहिण्यास ते अगदीच अपात्र आहेत, हें मोठ्या दु खाने सांगावे लागते

आमच्या बृहस्पति महाराजांनी पृथ्वीवर जाऊन मोहनलाल दवे किंवा संतोषी ह्यांच्याकडे तालीम घ्यावी अशी त्यांना आमची नम्र विनंति आहे

संगीताच्या दृष्टीनं तरी इंद्रदेवाचा हा बोलपट समाधानकारक आहे म्हणता काय ? छे ! तिथेंहि हा चित्रपट साफ कोसळला आहे म्यूझिक डायरेक्टर नारदमुनी ह्यांनी ह्या चित्राला इतके भिकार संगीत दिले कसे ह्याचेच नवल वाटतें नारदमुनी अजून मेघमल्हार आणि जयजयवंती आळवीत आहेत चित्रपटाच्या संगीतात केवढी क्रांति झाली आहे याची त्यांना कल्पना आहे काय ? 'सडे के सडे,' 'मेरा जूता है जपानी', 'कभी आर कभी पार' ह्यासारखी एकहि ढंगदार चाल जर नारदमुनींजवळ नाही तर ते ह्या बोलपटाचे संगीतदिग्दर्शक झाले कशाला ? नारदमुनी मोठे पट्टीचे गवयी असतील, पण चित्रपटाला संगीत देण्यास ते असमर्थ ठरले

आहेत.. स्वर्गांतून जरा खालीं उतरून त्यानी पृथ्वीलोकात संचार करावा आणि नौशाद, ओ. पी. नय्यर यासारख्या नामवंत म्यूझिक डायरेक्टराकडे चित्रसंगीताचे पाठ घ्यावे, अशी त्याना आमची नम्र सूचना आहे. म्हणजे ह्या चित्रात त्यानी घालविलेली अब्रू पुढील बोलपटात थोडीफार सावरण्याची आशा आहे

ह्या पडेल बोलपटाचे आणखी दुर्दैव हें की त्याला कलावंतहि अगदीच सामान्य दर्जाचे लाभले रंभा, उर्वशी, मेनका ह्या इंद्राच्या दरबारातल्या मोठ्या अप्सरा असतील पण, त्या काय सिनेमा नटी आहेत ? सिनेमात एक्स्ट्रॉ म्हणून काम करण्याची त्याची लायकी नाही ! ह्या बायकाजवळ अभिनय नाही, नखरा नाही, नजरेत फिरकी नाही आणि कमरेत गिरकी नाही. ह्या अप्सरा म्हणे मोठमोठ्या ऋषीची तपश्चर्या भंग करण्यात पटाईत आहेत. मेनकेने तर विश्वामित्राला पागल बनविले, पण प्रेक्षकाना पागल बनविण्यास ती अयशस्वी ठरली आहे

ह्या बोलपटाचे नाव 'अरण्यरुदन' असे आहे आणि नावाप्रमाणेच त्यात रडारड भरपूर आहे पण एकाहि नटीला रडण्याचा साधा अभिनय साधला नाहीं. निरुपा रॉय कशी रडते ते उर्वशीनें जरा बघून यावे

ह्या बोलपटात रंभा आणि मेनका नाचवल्या आहेत, पण त्याना वैजयंतीमालेची सर येईल काय ? कुठें वैजयंतीमालेचा डौल आणि नखरा व कुठें रंभा–मेनकेचा फडतूस अभिनय रंभेला उरोभागाची हालचाल साधत नाही आणि मेनकेला कटिभागाचा हिंदोला करता येत नाहीं. नृत्यामध्ये पदन्यासाला फार कमीं महत्व असतें सारा नाच इतर अवयवाचाच असतो, हें आमच्या स्वर्गातल्या अप्सराना केव्हा कळणार ! कलागुणाचा प्रश्न सोडून नुसत्या सौंदर्याचाच विचार केला तरी पृथ्वीवरील नटींची सर ह्याना येणार नाही रंभा कितीहि देखणी असली तरी नर्गिसची चिंचोळी हनुवटी तिला नाहीं. आणि मेनका कितीहि लावण्यसुंदरी असली तरी निम्मीसारखें चाफेकळी नाक तिला नाही.

इंद्रदेवाच्या या बोलपटात नटींनी जसा दगा दिला, तसा नटानींहि विचका केला आहे चंद्रसेन गंधर्व हा देखणा व रुबाबदार खरा, पण दिलीपकुमाराप्रमाणे डोक्यावर केसाची सजावट नसल्यामुळें त्याचे बिलकुल तेज

पडत नाही चित्रसेन गंधर्वाला भारतभूषणाप्रमाणे नाजुक हास्य साधत नाहीं या बोलपटातील दुसरा नट कामदेव हा मदनाचा पुतळा असेल, पण राजकपूरच्या नजरेतील आवारा चमक त्याच्या नजरेत नाहीं

आमच्या स्वर्गलोकात जॉनी वॉकरसारखा एकहि विनोदी नट नसावा हे दुर्दैव होय दिग्दर्शक इंद्रदेवाने खूप खटपट केली म्हणतात पण जॉनी वॉकरच्या तोडीचा नट त्याना स्वर्गमंडळींत कुठेंच आढळला नाही कॉमिक नटाच्या अभावी हा बोलपट अगदीच रुक्ष झाला आहे तरीपण शंकराचा नंदी या चित्रात प्रेक्षकाची करमणूक करण्याचा बराच प्रयत्न करतो पण जॉनी वॉकरची सर त्याला कशी येणार !

असो स्वर्गवासी फिल्म कंपनीचा हा पहिलाच बोलपट साफ कोसळला असे मोठ्या खेदाने म्हणावे लागतें हा बोलपट काढून इंद्रदेवाने स्वत ची बेअब्रू तर करून घेतलीच, पण बृहस्पति, नारदमुनी, रंभा, उर्वशी, मेनका ह्या सगळ्या नामवंत मंडळीवर फजितीचा प्रसंग आणला आहे ह्या दरिद्री बोलपटाने तमाम स्वर्गलोकाची बदनामी झाली आहे चित्रपटाचा धंदा मानवानीं करावा देवानी करू नये म्हणून इंद्रदेवाना आमची विनति ही कीं, त्यानीं भलत्या गोष्टीचा नाद सोडून द्यावा आणि आपल्या देवपणाला सुचित असेच धंदे करावे

'देवदूत' वर्तमानपत्राचा हा अभिप्राय वाचून स्वर्गलोकात फार खळबळ उडाली हा अंक घेऊन नारदमुनी इंद्राकडे गेले आणि त्याच्या अंगावर अंक फेकून म्हणाले, "वाचलीत ना तुमची आरती ! चांगलीच शोभा झाली की नाही ?'

"तुमच्यामुळेंच मला ही दुर्बुद्धी सुचली' इंद्र खजील होऊन म्हणाला "तुम्हीच मला पृथ्वीलोकावर ताण करण्यासाठीं सिनेमा काढण्याची चिथावणी दिली"

"तुमचे गर्वहरण व्हावे हाच माझा हेतु होता आता पुन्हां दुसरा बोलपट काढण्याची उमेद आहे काय ?"

"छे छे ! नाव काढू नका !" देवेंद्र निश्चयी स्वरांत म्हणाला, " झाली एवढी बेअब्रु पुरे कुबेरहि मला म्हणाला कीं असानें आपलें दिवाळें वाजेल

रंभा आणि मेनका दरबारात येण्याच्या बंद झाल्या आहेत बाहेर तोंड दाखवायला त्यांना लाज वाटणारच बृहस्पति गुरुदेवहि कुठे अरण्यात दडी मारून बसले आहेत

"मीहि सहा महिने हिमालयावर जाऊन बसतो ' नारदमुनी क्षणार्धात तपन निसटले

□□□

## लांडगा आला रे आला! : १२

मेंढपाळाचा पोर गोविंदा मोठा खोडकर मुलगा होता. तो रोज सकाळी रानात शेळ्यामेंढ्या घेऊन जाई जनावराना चरायला सोडून स्वत काही-तरी उपद्‌व्याप करी. एक दिवस तो असाच नेहमीप्रमाणे—रानात गेला असता आज काहीतरी नवीन खोडी करावी असे त्याला वाटले. त्याच्या मनात आले, गावातल्या लोकाची गमत करावी! त्याने आरोळी ठोकली, 'धावा! धावा! लाडगा आला रे आला!'

गोविंदाची ती भयभीत आरोळी ऐकून गावातले लोक हातात लाठ्या घेऊन रानात धावत गेले, पण पाहतात तो काय! गोविंदा मिस्कीलपणे हसत होता लाडगा नव्हता की वाघहि नव्हता शेळ्यामेंढ्या निवातपणें चरत होत्या लाडगा आल्याची खोटीच हूल उठवून गोविंदाने आपल्यास बनविले, म्हणून गावकरी चिडले गोविंदाला चार शिव्या हासडून ते निघून गेले

दुसऱ्या दिवशी गोविंदानें पुन्हा तेंच नाटक केले. 'लाडगा आला रे आला!' असा हुंवरडा त्याने फोडला गावकरी पुन्हा गोविंदाच्या मदतीला धावून गेले! पण लाडग्याचा पत्ताच नव्हता! कालच्या प्रमाणेच आजहि गावकऱ्याची फजिती झाली होती

पण तिसऱ्या दिवशी मात्र रानात खरोखरच एक भयकर लाडगा आला. भीतीने गोविंदाची गाळणच उडाली गोविंदा जीव तोडून ओरडला, 'धावा! धावा! लाडगा आला रे आला!'

पण ह्या खेपेला गावकरी धावून गेले नाहीत. ते म्हणाले, 'हा लबाड मुलगा आहे! रोज रोज आम्हाला बनवितो. ह्या पोराच्या ओरडण्यावर काय विश्वास ठेवायचा!'

तिकडे लाडगा गोविंदाच्या दिशेने एकएक पाऊल टाकीत, जबडा पसरून येऊ लागला. गोविंदा तोंडाचा आ पसरून थरथर कापू लागला. त्या हिंस्त्र श्वापदापुढें साष्टांग नमस्कार घालून गोविंदा म्हणाला, 'हे लाडगेश्वरा, मी तुला शरण आलो आहें. माझ्यावर दया कर. मला जीवदान दे!'

लाडग्याला पाहताच शेळघामेंढघामध्येहि हलकल्लोळ माजला. त्या सैरावैरा पळत सुटल्या. सारे रान हृदयस्पर्शी विलाप गीतानी भरून गेले!

गोविंदा लोटांगण घालून जमिनीवर तसाच पडून होता. मान वर करून लाडग्याच्या नजरेला नजर भिडविण्याची त्याला हिंमत नव्हती! अखेरची घटका आता भरली ह्या ठाम समजुतीने त्याने डोळे मिटून घेतले.

हा सारा प्रकार पाहून लाडगा दुःखीकष्टी झाला आपल्या आगमनाने आसमंतात घबराटीने वातावरण निर्माण व्हावे ह्याने त्याला वाईट वाटले, ह्या भीतिग्रस्त प्राण्याची कशी समजूत घालावी, त्याने कसे सांत्वन करावे. हेंच त्याला समजेना.

अत्यंत शांत आणि सौम्य मुद्रा करून अतिशय मृदु स्वरात लाडगा म्हणाला,

"माझ्या लाडक्या मुला, ऊठ! भिऊ नकोस मी तुला खाऊन टाकणार नाही तुझ्या शेळघामेंढघानाहि अपाय करणार नाही मदतीसाठीं, गावकऱ्याना हाका मारू नकोस मी निरुपद्रवी लाडगा आहे. स्नेहशील, आहे, प्रेमळ आहे, मायाळू आहे. बेटा मला कडकडून प्रेमालिंगन दे."

लाडग्याने गोविंदाला जवळ ओढून घट्ट मिठी मारली गोविंदाची छाती धडधडू लागली. त्याचे प्राण क्षणभर स्वर्गांत गेले आणि नंतर फिरून कुडीत आले! हा विलक्षण चमत्कार पाहून तो हतमूढ झाला! हें स्वप्न आहे की सत्य आहे? हा लाडगा आहे की बोकड आहे?

गोविंदाच्या डोक्यावरून ममतेचा हात फिरवीत लाडगा म्हणाला, "बेटा अजून तुझी भीति गेली नाहीं? अजून तुला माझा विश्वास वाटत नाही? अरे, माझ्याकडे नीट बघ. माझी ही सात्विक मुद्रा आणि निष्पाप जबडा पाहून घे. बेटा, मी लाडग्याच्या कुळात जन्माला आलो असलो तरी वृत्तीने लाडगा नाही. मी अहिंसावादी लाडगा आहे. शाकाहारी लाडगा

आहे प्राणिहत्या आणि रक्तपात मला मजूर नाही हिंसा हे मी पाप समजतो, म्हणूनच तुझ्या शेळचामेंढचावर माझी वासना नाही आयुष्यात मासाहार करणार नाही अशी मी घोर प्रतिज्ञा केली आहे "

लाडग्याने डोळे मिटून घेतले आणि कसल्यातरी गूढ चितनात तो मग्न झाला

गोविंदाच्या मनातील भीति आता बरीच दूर झाली शेळीपेक्षाहि गरीब असे ते निरुपद्रवी ध्यान पाहून गोविंदा नवल करू लागला पहिल्या भेटीत आपण अकारण गैरसमज करून घेतला आणि 'लाडगा आला रे आला' अशी आरोळी ठोकून आपण ह्या थोर प्राण्याची अप्रतिष्ठा केली, याबद्दल त्याला हळहळ वाटली गोविंदाने आपल्या गालावर दोन चापटचा मारून घेतल्या आणि लाडग्याची माफी मागितली

"लाडगेदादा, मला क्षमा कर मी अनत अपराधी आहे अजाण बालक आहे बरे झाले, माझी आरडाओरड ऐकून गावकरी इथे धावून आले नाहीत ते जर आले असते तर तुझ्यासारख्या सज्जन प्राण्यावर केवढा विपरीत प्रसग ओढावला असता !"

"हा अहिंसेचा प्रभाव आहे बेटा !" मुखमडलावर दैवी हास्य आणीत लाडगा बोलू लागला, "देव तारी त्याला कोण मारी ? अहिंसेचा पाठीराखा परमेश्वर आहे मी अहिंसावादी आहे म्हणूनच तुझ्या गाववाल्याना इथे धावून येण्याची बुद्धी झाली नाही "

वर आकाशाकडे पाहून लाडग्याने ईश्वराचे आभार मानले नतर तो कसलेसे भजन गुणगुणू लागला

नेहमी गुरगुरणारा लाडगा आज गुणगुणू लागलेला पाहून शेळघा मेंढघानाहि नवल वाटले भीतीने दूर पळून गेलेल्या शेळघा लाडग्याच्या जवळ जवळ येऊ लागल्या त्याच्या मनातील भीति पार नष्ट झाली होती. तो लाडगाहि शेळचामेंढघाबरोबर थट्टाविनोद करू लागला त्याचे प्रेमळ सवाद गोविंदा कान लावून ऐकू लागला !

लाडगा–शेळीताई, खुशाल आहेस ना ? अशी उभी का ? बैस इथे !

शेळी–लाडगेदादा, किती चागला आहेस रे तू ! किती सालस ! किती प्रेमळ ! बोकडापेक्षाहि गरीब !

लाडगा–ताई, कशाला थट्टा करतेस माझी ? लाडग्यानें कधीं नैतिक उन्नति करून घेऊ नये की काय ?

मैंढा–काय रे लाडगेदादा, तू खरोखरच लाडगा आहेस कीं लाडग्याची कातडी पांघरलेला कोल्हा आहेस ?

लाडगा–मी कशाला बनावटपणा करू ! ढोंगीपणा मला पसत नाही संशय वाटत असल्यास खात्री करून घे. हा माझा जबडा, हा पंजा, ही पाठ

मैंढा–खरच की ! तू अस्सल लाडगा आहेस लाडगदादा, तू ! आम्हाला खाऊन तर टाकणार नाहीस ना ?

लाडगा—भाऊ, अजून भीति वाटते तुला माझी ? वेडा रे वेडा ! चल, आपण हुतुतू खेळू ! नाहीतर शेळीताई, तू माझ्या पाठीवर बैस, आपण घोडा घोडा खेळू !

शेळी—लाडगेदादा, तुला गाण आवडत का रे ? मी एक छान छान गाण म्हणतें हृ तुझ्यासाठी !

एक लाडगा आज भेटला ।
मानवतेचा अर्थ वाटला ॥
किती गोड लाडगा बोलतो ।
शेळीसगें खेळ खेळतो ॥
असे लाडगा शाकाहारी ।
दहीं दुधाची आवड भारी ॥
कधीं न मारुन खाई शेळी ।
घास आवडे खजूर केळीं ॥

शेळी गाणे गात असता लाडगा नृत्य करू लागला हा सारा देखावा पाहून गोविंदा वेडापिसा झाला दोन्ही हात जोडून अतिशय भक्तिभावान तो म्हणाला, ' हे लाडगेश्वरा, तुला मी शरण आलो आहे ! जगातल्या तमाम अहिंसावाद्यानी गुरु करावा अशी तुझी लायकी आहे मानवतेचे एक दिव्य-दर्शन आज मला घडले लाडगा असून तुझ्यात एवढी माणुसकी ! खुद्द माणसातहि न आढळणारी ही अलौकिक माणुसकी तुला प्राप्त झाली तरी कशी ? लाडगेदादा तुझा हृदयपालट कसा रे झाला ? "

## ७० : आवळ्या भोपळ्याची मोट

"तो सारा इतिहास मी तुला सागतो. पण प्रथम माझी खाण्यापिण्याची सोय करशील का ? मला फार भूक लागली आहे हे तुला माहीत आहेच थोड शेळीच दूध आणि फळाचा बदोबस्त होईल तर उपकार होतील"

गोविंदाने तावडतोब लाडग्याची विनति मान्य केली दुग्धपानाने आणि, फलाहाराने लाडगा सतुष्ट झाला गोविंदाचे आभार मानून तो म्हणाला, " बेटा, मेंढपाळ कुमारा, तुझ्या या पाहुणचाराने मी अगदी खूप झालो आहे आता तुला मी माझी जीवन कहाणी सागतो माझ्या जीवनात हा कायापालट कसा घडून आला ! आचारविचारात ही क्राति कशी झाली ? मी पामर काय उत्तर देणार ! सद्गुरूची कृपा आहे ईश्वराची ही लीला आहे. तो पहा, ती पलीकडे टेकडी दिसते ना ? त्या डोगर टेकडीवर साधूराम नावाचा एक सत्पुरुष राहतो तो रोज प्रवचन झोडतो आणि पुराण सागतो ह्या अरण्यातील श्वापदाना ता शातीचा, अहिंसेचा उपदेश करीत असतो साधुरामाचा सदेश अनेक प्राण्याना पटला आणि त्यानी हिंसाचार मोडून दिला एक दिवस मी भक्ष्य शोधीत असता एका म्हातारीचे कोबडें माझ्या तावडीत सापडले कोबड्यावर झडप घालून मी पळ काढीत असता वाटेत साधुराम मला भेटला माझे ते कृत्य पाहून त्याला दुःख झाले. माझ्या जबड्यात सापडलेल्या त्या असहाय्य कोबडीच्या प्राणातिक किकाळ्या ऐकून साधूरामाचे हृदय कळवळले आडवा पडून अत्यत काकुळतीच्या स्वरात तो माझी विनवणी करू लागला, "थाब, लाडगे बुवा, थाब सोडून दे ते कोबडें ! गरीब, निष्पाप जीवाची हत्या करू नकोस तुला भूक लागली असेल तर मला खा ! ह्या साधुरामला खा, पण कोबडीला खाऊ नकोस ! मित्रा, लाडग्या, हा रक्तपात योग्य नाही मूक प्राण्याची हत्या करून, जीवनाच्या उच्च मूल्याना तू कलक लावू नकोस चल साड ती कोबडी ! वाटल्यास माझ्या नरड्याचा घास घे, पण कोबडीला जीवदान दे त्या दीन, दुबळ्या प्राण्याची तुला दया येत नाही काय ? बघ, त्या कोबडीचा केविलवाणा चेहरा ! काळाच्या कराल दाढेंत ती अगतिक होऊन पडली आहे ! अरे, ह्या घोर कृत्याचे पातक कुठें फेडशील ? आपल्या पाशवी बळाचे असे हिडीस प्रदर्शन करू नकोस ! ' असे म्हणून साधुरामाने माझ्या जबड्यात हात घातला आणि कोबडें ओढून बाहेर काढलें ! "

"कमाल, आहे साधुरामाची!" गोविंदा एकदम उद्‌गारला, लांडग्याच्या जबड्यात हात घालून कोंबडे बाहेर खेंचणे म्हणजे केवढें धाडस! आणि लांडगेदादा, तू कसा रे गप्प राहिलास?"

"काय करणार?" लांडगा हताशपणें म्हणाला, "साधुरामाची उपदेशवाणी ऐकून माझा हृदयपालट झाला मला अहिंसेचे तत्त्व पटले माझ्या जबड्यात तडफडणाऱ्या त्या चिमुकल्या जीवाची मला दया आली. साधुरामाच्या एक एक वाक्यागणित कोंबडीच्या मानेवरील माझी पकड ढिली होत गेली शेवटी कोंबडीची सुटका झाली! अहिंसेचा विजय झाला! साधुरामाचा विजय झाला!"

लांडग्याची ही आत्मकहाणी गोविंदा एकाग्र चित्ताने ऐकत होता. शेळ्यामेंढ्याहि कान टवकारून ऐकत होत्या ह्या रक्तपिपासू क्रूर श्वापदाच्या अंत करणात मानवतेचा संचार कसा झाला हे रहस्य गोविंदाला आता कळून आले!

"बर लांडगेदादा, नमस्कार! मी जातो आता! बराच उशीर झाला. गावकरी तिकडे माझी वाट बघत असतील" गोविंदा लांडग्याचा निरोप घेऊ लागला

"ओळखदेख ठेव ह! असाच भेटत जा मधूनमधून!" शेळीताई म्हणाली.

मेंढ्याचाहि कंठ सद्‌गदित झाला लांडग्याला प्रेमालिंगन देऊन तो म्हणाला, "भाऊ, विसरू नकोस ह आम्हाला आम्ही रोज इथें चरायला येतो तूहि रोज आम्हाला भेटत जा"

"जरूर जरूर!" लांडगा मिस्कील हास्य करीत म्हणाला, नंतर गोविंदाकडे वळून तो दटावणीच्या सुरात म्हणाला, "मूर्ख पोरा, जातोस कुठें? जरा थांब! मी आता सांगितलेली कथा संपली नाहीं फक्त अर्धा भाग तुला सांगितला, पुढील अर्धा भाग ऐकून घेतल्याशिवाय तुला मी जाऊ देणार नाहीं ऐक मेंढपाळ, कान लांब करून ऐक! साधुरामाचा उपदेश ऐकून मी माझ्या तोंडातील घास टाकून दिला, पण मी सोडून दिलेली ती कोंबडी साधुराम घेऊन गेला आणि त्याच रात्री त्याने तिचा खिमा करून मेजवानी झोडली! मला धक्काच बसला! साधुराम हा

केवढा ढोंगी आहे आणि त्याची अहिंसा हें केवढें थोतांड आहे हे समजताच मला संताप आला. आम्हा लांडग्यापेक्षा हे मानवी लांडगे किती धोकेबाज असतात ! बस्स ! मग मीहि ठरविलं की आपणहि अशीच बुवाबाजी करावी वास्तविक आम्ही लांडगे ढोंगी नसतो आत एक, बाहेर एक असे नाटक आमच्याकडे नाही पण तुम्ही माणसानी आम्हाला ही नीति शिकविली साधुरामाने मला हा धडा दिला ! साधुराम माझा गुरू ! मी त्याचा चेला ! खुळ्या धनगरा, मघापासून मी मानवतेचे व भूतदयेचे जें प्रदर्शन केले तें सारे नाटक होतें ! ती सारी धूळफेक होती, आता माझें अस्सल स्वरूप तुला दाखवितो डोळे उघडून नीट पहा !"

आणि दुसऱ्याच क्षणात लांडग्याने शेळीवर झडप घातली आणि तिची मानगूट पकडून तो जंगलात पसार झाला !

गोविंदाची अक्कल गुंग झाली ! सारे प्राण एकवटून तो ओरडला, "धावा हो धावा ! लांडगा आलारे आला !"

□□□

## अधिक अक्कल पिकवा : १३

ठणठणपूर संस्थानात अकलेचा फार मोठा दुष्काळ पडला सारी प्रजा अकलेवाचून बेअकली बनली जिकडेतिकडे अकलेचा तीव्र तुटवडा भासू लागला 'आम्हाला अक्कल द्या!' 'आम्हाला अक्कल द्या!' अशा मागण्या करीत हजारो नागरिकांचे मोर्चे राजवाड्याकडे येऊ लागले राजा हवालदिल झाला अष्टप्रधान गोंधळून गेले राजदरबारातील शास्त्री आणि पंडित यांचीहि या अकलेच्या दुष्काळावर अक्कल चालेना! इतक्या लक्षावधि लोकांना अक्कल कशी पुरवायची, हाच सर्वांपुढें मोठा प्रश्न पडला! आपल्या राज्यात इतके असंख्य लोक बेअकली असावेत याचें राजालाहि फार वाईट वाटले! पण करणार काय? राजाची अक्कलच कुंठित झाली होती!

पण कसेहि करून या अक्कल-दुष्काळावर तावडतोब उपाययोजना करणे जरुरीचे होतें कारण अक्कल नसेल तर माणसाच्या जीवनाला अर्थ काय? माणूस आणि पशू यांच्यात काहीं फरक उरणार नाही शिवाय आपल्या संस्थानात इतके हजारो बेअकली लोक असणे हें राज्यकर्त्याला खास भूषणावह नाहीं, याची राजेसाहेबांना जाणीव होती राजेसाहेबांच्या आंतरराष्ट्रीय दर्जालाहि यामुळें धक्का पोचणार होता! इतर देशांत लहान मुलगासुद्धा आपल्या बापाला अक्कल शिकवितो, आणि आपल्या देशांत मात्र खुद्द बापालाच अक्कल नसावी, हें केवढें दुर्भाग्य! राजेसाहेबांना फार हळहळ वाटू लागली! ठणठणपूर संस्थानात निर्माण झालेल्या अक्कल-दुष्काळाचे कारण शोधून काढण्यासाठीं आणि त्यावर उपाययोजना सुचविण्यासाठी राजेसाहेबांनी तज्ञांची एक अक्कल-समिती नेमली! बरेच दिवस डोकेफोड करून अक्कल-समितीनें एक अहवाल सादर केला!

## अक्कल–समितीचा अहवाल

अक्कल–समितीनें सादर केलेल्या अहवालात पुढील माहिती आहे

(१) ठणठणपूर संस्थानात अकलेचा तीव्र तुटवटा भासण्याचे कारण अकलेची झालेली नाकेबंदी आणि साठेबाजी होय

(२) आज एका मूठभर वर्गाच्या हातातच अक्कल साठलेली आहे ज्ञान, विद्या, शिक्षणाची साधने वगैरे या मूठभर लोकांच्याच स्वाधीन आहेत या लोकानी विद्येची नाकेबंदी केली आहे म्हणून ज्ञानाचा प्रसार आणि फैलाव होत नाही यामुळें बहुजनसमाज अज्ञानी व अडाणी अक्षरशत्रू राहिला आहे

(३) एकीकडे मूठभर विद्याविभूषित शहाणे आपल्या विद्वतेची आणि अकलेची घमेंड मिरवीत असताना, दुसरीकडे लाखो निरक्षर लोक अज्ञानाच्या गर्तेत जनावराचे जीवन कठीत आहेत मानवतेला हें लाछन आहे ही विषमता दूर झाली पाहिजे मूठभर विद्वानाच्या घरात तुबलेली ज्ञानगगा जोपर्यंत बहुजनसमाजापर्यंत जाऊन पोचणार नाही तोपर्यंत हा अकलेचा दुष्काळ असाच राहणार ! सरकारने हा प्रश्न हाती घेतला पाहिजे

(४) पण या कार्याला अडथळे आहेत देशातील एका स्वार्थी गटाचा याला विरोध आहे बहुजनसमाजाच्या पिळवणुकीवर ज्याची चैन चालली आहे, अशा काही पुजीपतीना ज्ञानगगेचा सर्वत्र फैलाव होणे इष्ट वाटत नाहीं कारण बहुजनसमाजाच्या अज्ञानातच याचा फायदा आहे बहुजनसमाज सुशिक्षित आणि जागृत झाला तर या पुजीपतीच्या आर्थिक हितसबधाला आणि वर्चस्वाला फार मोठा धक्का बसणार आहे ! या भीतीनेच हे भांडवलदार बहुजनसमाजापर्यंत ज्ञानाचा प्रसार होऊ नये याबद्दल योग्य ती खबरदारी घेत आहेत ही परिस्थिति चिंताजनक आहे !

(५) ठणठणपूर संस्थानात शास्त्री, पडित, महामहोपाध्याय वगैरे विद्येचे जे थोडे मक्तेदार आहेत ते सर्व या भाडवलदाराचे हस्तक आहेत पुजीपतीनी या विद्यापतींना विकत घेतलें आहे यामुळें धनवताचे हितसबध राखण्याकडेच या विद्यावताचा ओढा आहे म्हणून बहुजनसमाजाला ज्ञानदान करण्यास कोणी पुढें येत नाही श्रमजीवी वर्गाला चिरतन दास्यात ठेवण्यासाठी

भाडवलदारानी रचलेल्या कारस्थानात काही स्वार्थी अक्कलवतहि सामील आहेत हें दुर्दैव होय काही शास्त्री-पडित तर स्वत वर्णश्रेष्ठतेच्या अहकाराने शूद्रादिकाना ज्ञानदान करण्यास नाखूप असतात ! या सर्व अनर्थाचा परिणाम ठणठणपूर सम्थानात अक्लेचा दुष्काळ पडण्यात झाला आहे.

(६) या गभीर परिस्थितीवर उपाययोजना काय करावी, हाहि एक गभीर प्रश्न आहे एक तर, परदेशातून अकलेची आयात करायची, किंवा आपल्याच सस्थानात अकलेचे भरपूर उत्पादन करायचे परदेशातून अक्कल आयात करायची म्हणले तर तिकडचे शिक्षणतज्ञ आणि प्रोफेसर इकडे मागवावे लागतील हें मोठें खर्चाचे काम आहे ठणठणपूर सस्थानाची तिजोरी परदेशातील रेसचे घोडे विकत घेण्यातच खलास झाली असल्यामुळें आणखी शिक्षक मागविण्याचा प्रश्नच उरत नाही

(७) म्हणून परदेशातून अकलेची मागणी करण्यापेक्षा इथल्या इथेंच अक्लेच उत्पादन वाढविणे शहाणपणाचे आहे यासाठी 'अधिक अक्कल पिकवा' ही मोहीम जोरात सुरु करण्यात यावी ही मोहीम यशस्वी करण्यासाठी राजेसाहेबानी स्वत पुढाकार घ्यावा आणि सर्व जनतेने या कार्याला वाहून घ्यावे अकलेच्या उत्पादनात भरपूर वाढ होईपर्यंत सध्या अकलेचे रेशनिंगहि सुरू करण्यात यावे आता 'अधिक अक्कल पिकवा' म्हणज काय पिकवायचे आणि अकलेचे रशन कस चालू करायचे, यामधी राजेसाहेबानींच आपली अक्कल लढवावी



## मोहीम सुरू झाली

अक्कल-समितीने केलेल्या शिफारशी ठणठणपूरच्या राजेसाहेबाना एकदम पटल्या आणि त्याप्रमाणे ते कार्याला लागले अधिक अक्कल पिकविण्याचा आदेश त्यानी प्रजाजनाना दिला जिकडे तिकडे भिंतीवर, वाड्यावर, तारेच्या खाबावर 'अधिक अक्कल पिकवा' अशी पत्रके चिकटविण्यात आली घरोघरी आणि गल्लोगल्ली हाच संदेश देणारी हस्तपत्रके वाटण्यात आलीं पण हे सारे श्रम आणि सगळा प्रचार फुकट गेला ! कारण बहुसख्य अशा निरक्षर जनतेला त्या भिंतीपत्रकातला आणि हस्तपत्रकातला मजकूरच

वाचता येईना ! आपल्या प्रचाराचा अजून परिणाम का होत नाही या विवचनेंत राजेसाहेब बसले होते शेवटी त्याच्या चपरस्यानेच याचे कारण त्याना समजावून सांगितले आणि मग आपलीहि अक्कल चुलींत गेली, असे राजेसाहेबाना वाटले ! नतर त्यानीं तोंडी प्रचार करण्याचे ठरविले अष्ट-प्रधानाना बरोबर घेऊन राजेसाहेब एका मोटार–लॉरींत बसले आणि लाऊड–स्पीकरवरून ओरडू लागले तेव्हा कुठें लोकाना हें काय प्रकरण आहे याचा पत्ता लागला !



## राजेसाहेबांची स्फूर्तिदायक ओरड

राजेसाहेबाची मोटार–लॉरीवरील स्फूर्तिदायक ओरड ऐकून ठणठण पुरच्या प्रजाजनामध्यें उत्साहाचे वातावरण निर्माण झाले 'अधिक अक्कल पिकवा !' या मोहिमेचे महत्त्व राजेसाहेबानीं जनतेला सांगितले राजे-साहेबाच्या ओरडण्याचा साराश पुढीलप्रमाणें होता–

"माझ्या बेअकली प्रजाजनहो, आपल्या सस्थानात आज अकलेचा भयकर दुष्काळ भासत आहे म्हणून निराश होऊ नका ! हा दुष्काळ निवारण करण्याच्या कार्माला तुम्हीं लागा !

"स्वत.च्या बेअकलीपणाबद्दल सरकारला दोष देण्यापेक्षा, प्रत्येकानें शिक्षण घेऊन अकलेचे उत्पादन वाढवावे आपल्या सस्थानात बहुसख्य प्रजा निरक्षर आणि अज्ञाणी आहे म्हणून साक्षरता प्रचारापासून अधिक अक्कल पिकविण्याची मोहीम सुरू झाली पाहिजे

"लहान मुलानीं, प्रौढानी, आणि स्त्रियानींसुद्धा साक्षरतेच्या चळवळींत भाग घेऊन अकलेच्या उत्पादनात भर घातली पाहिज, तरच अज्ञानाचा अधार दूर होऊन तुमचा बेअकलीपणा नष्ट होईल

"स्त्रियाची अक्कल चुलीपुढें, म्हणून त्यानीं गप्प बसता कामा नये एक वेळ पुरुष बेअकली असला तरी चालेल, पण स्त्री बेअकली असता कामा नये कारण ससार चालवायला आणि मूर्ख नवऱ्याबरोबर दिवस काढायला स्त्रियाना अकलेची फारच जरूरी असते म्हणून तुम्हा सर्वांना विनती ही की आजपासून 'अधिक अक्कल पिकवा !' या मोहिमेला लागा आणि अकलेचा दुष्काळ दूर करा !"



## व्यापाऱ्यांची नफेबाजी !

राजेसाहेबाच्या आदेशाप्रमाणें ठणठणपूरची जनता अधिक अक्कल पिकवण्याच्या उद्योगास लागली हजारो निरक्षर लोक पाटया-पेन्सिली विकत घेण्यासाठीं दुकानात गर्दी करू लागले ही संधि साधून व्यापाऱ्यानी नफेबाजीला सुरवात केली पाटया पेंसिली भयंकर महाग झाल्या पाठ्य-पुस्तकें काळ्या बाजारात गडप झाली ठणठणपूर संस्थानात ज्या थोडया शाळा होत्या त्यानीं एकदम फी-वाढ केली ! यामुळें गरीब जनतेची मोठीच कुचंबणा झाली अशा परिस्थितींत अधिक अक्कल पिकवावी कशी ? मोहिमेवर मोठेंच संकट आले पण या नफेबाजीला आळा घालण्यास राजेसाहेब असमर्थ होते कारण भांडवलदाराना दुखवाव कसे ? राजेसाहेबाच्या चैनबाजीमुळें संस्थानी तिजोरीचे दिवाळें वाजले होतें आणि भांडवलदाराच्या कर्जानें कसाबसा राज्यकारभार चालत होता ! राजेसाहेब मोठ्या पेचात पडले ! तेव्हा दातओठ खात त्यानी अकलेचे रेशन सुरू केले !



## अकलेचें रेशन

राजेसाहेबानी दोनचार सरकारीं दुकानें खोलली आणि त्या ठिकाणीं कंट्रोल भावानें मोडक्या-फुटक्या पाटया व फाटकीं पुस्तके विकण्याची सोय केली. त्याचप्रमाणे दोनचार सरकारी शाळा उघडल्या ! पण हजारो निरक्षर लोकाची सोय या दोन चार शाळामधून होणार कशी ? राजेसाहेबानी शाळाचेहि रेशन सुरू केले म्हणजे शमर शमर लोकाचा एक वर्ग पाच पाच मिनिटात मोकळा करून सोडून द्यावयाचा ! यामुळें प्रत्येकाला दिवसातून पाच मिनिटें तरी अक्कल मिळण्याची सोय झाली ! अगदींच बेअकली असण्यापेक्षा, थोडेंथोडें तरी अकलेचे वाटप प्रत्येकाला मिळू लागले, ही काही कमी समाधानाची गोष्ट नव्हती !

□□□

## कुंदाराणीचें स्वयंवर : १४

( मुबईच्या रस्त्यात एक कुत्रा दवडी पिटतो )

ऐका ऐका जनहो ऐका
खबर सागतो तुम्हा लोका
मगल सण हा आज दिवाळी
लगीन आहे सायकाळी
चला, चला, लग्नाला चला

( कुत्र्याची दवडी ऐकून लोक जमतात )

एकजण– काय भुकतो हा कुत्रा !

दुसरा– लगीन आहे म्हणतो ! वेडा तर नाही ! दिवाळीत कसल लग्न ?

तिसरा– आता लग्नाचे मुहूर्त कुठले ? काय रे कुत्र्या ? कुणाच लग्न ?

कुत्रा– सागतो, सगळ काही सागतो, ऐकून घ्या !

धनीण माझी कुदाराणी
फिल्मीवाला चतुर देखणी
हातामध्यें गुलाबदाणी
वाटोळी नाजूक ठेंगणी
पाठीवरती लोळे वेणी
नाचत नाचत गाते गाणी
पचविशीची ऐन जवानी
एकच चिंता परी ती मनी
नवरा तिजला नाही कोणी

( कुत्र्याचा कठ दाटून येतो लोकहि हळहळू लागतात )

एकजण– अरेरे ! अशा सर्वगुणसंपन्न सुदरीला नवरा नाहीं म्हणजे काय !

दुसरा– केवढें हें भयकर दुःख ! दिवाळी कशी करावी तिने ? कायरे कुत्र्या, तुझी मालकीण कुदाराणी अविवाहित आहे, हे कळलें. पण तूं आज लग्नाच आमंत्रण द्यायला आलास; तेव्हा तिच लग्न जमल की काय ?

कुत्रा– तस अजन कुठेंच जमल नाहीं पण लग्न जमविण्याचा प्रयत्न चालू आहे. आज आमच्या कुदाराणीन आपल स्वयवर माडलं आहे. त्यासाठी जाहीर आमत्रण द्यायला आलों आहें मी !

तिसरा– अस्सं काय ! आम्हीं तुमच्या स्वयवराला येऊ म्हणता ?

कुत्रा– होय ! जरूर या ! ह्या अफाट शहरात हजारों विवाहेच्छू तरुण आहेत. आमची धनीण कुदाराणी हीहि सौभाग्यकांक्षिणी आहे. स्वयवरमडपात जमणाऱ्या असख्य उमेदवारातून ती इच्छित वराला माळ घालील. मनपसत नवरदेव निवडून काढील.

एक म्हातारा– तो भाग्यवान् पुरुष कोण असेल बरे ?

कुत्रा– तुम्हींसुद्धा असू शकाल. ही लॉटरी आहे. त्वरा करा ! स्वयंवरात भाग घ्या, ही अमूल्य सधि दवडू नका. नशिबाची परीक्षा पहा !

एक मुलगा– आजोबाना म्हातारचळ लागला कीं काय ! आत्ता जाऊन आजीला सागतों.

कुत्रा– मंडळी, आज सायकाळचा गोरज मुहूर्त लक्षात ठेवा. कुदाराणी स्वरूपसुदर, आज माडिले तिनें स्वयवर, सायकाळी चौपाटीवर, तुम्ही यावें तेथें सत्वर, नशिबाचा जो असे शिकदर, करात त्याच्या घालील ती कर॰ (कुत्रा जोरजोरानें भुकून दवंडी पिटतो. रस्त्यात लोकाची गर्दी पाहून पोलीस धावून येतो )

पोलीस– ए कुत्र्या काय गडबड लावली आहेस रस्त्यात ? रहदारीला अडथळा होतो ना ? चल हाट् !

कुत्रा– पोलीस दादा, तुम्हीपण स्वयवराला या ह !

(पळत जातो.)

× + ×

( चौपाटीवर स्वयंवरासाठी गर्दी जमली आहे. कुंदाराणी हातांत वरमाला घेऊन उभी आहे. शेजारी कुत्रा घुटमळत आहे. )

कुत्रा– बाईसाहेब, पहा कशी गर्दी जमली आहे. हजारों उमेदवारांनीं ' हाऊसफुल्ल ' झाली आहे चौपाटी ! शहरातील प्रतिष्ठित लोक, वकील, डॉक्टर, देशभक्त, व्यापारी, कवि, चित्रपटनिर्माते वगैरे कितीतरी उमेदवार तुमच्या स्वयंवरासाठीं धांवून आले आहेत.

कुंदाराणी– सेवका कुत्र्या, मी या प्रसंगी अगदी भांबावून गेलें आहे ह्या इतक्या थोर थोर उमेदवारातून मी कुणाची निवड करूं ? कुणाला माळ घालू ?

कुत्रा– मालकीणबाई, विचार काय करतेस ? लग्नासारख्या क्षुल्लक कामाला एवढा विचार कशाला ? कुणालाहि वरमाला घाल सगळे इथून तिथून सारखेच ! मेली पुरुषाचीच जात !

कुंदाराणी– हे श्वानशिरोमणी, तू माझा सेवक, तसाच मार्गदर्शक ! प्रेमळ सल्लागार ! तू मला या प्रसंगी सल्ला दे.

कुत्रा– बाईसाहेब, मी तुमच्या दारीचा सामान्य कुतरडा ! मला काय अक्कल असणार ! तुम्हाला कसला नवरा पाहिजे हें मला कस समजणार ? तुमच्या खाण्यापिण्याच्या आवडीनिवडी मला माहीत आहेत. वेशभूषेच्या व फॅशनच्या आवडीनिवडी मला माहीत आहेत पण पतिविषयक तुमची आवडनिवड अद्याप मला समजली नाही.

कुंदाराणी– सेवका, या ठिकाणी जमलेल्या एक एक व्यक्तिचा मला परिचय करून दे.

कुत्रा– चल तर, माझ्या मागून ये. हा पहा, हा एक संभावित गृह पाढरी टोपी घालून रुबाबात बसला आहे. फार मोठा धंदा चालतो ह्याचा !

कुंदाराणी– कसला धंदा करतात हे महाशय ?

कुत्रा– हातभट्टीचा. याच नाव नवटाकजी नवसागरवाला. हातभट्टीत नवसागर फार घालतात म्हणून ह्याना नवसागरवाला हे नाव पडलं आहे.

नवसागर तुम्ही शिरोमणी
लग्नाला आलां ।
घालिल तुम्हा कुंदाराणी
आता वरमाळा ।।

कुंदाराणी– इश्श ! कुत्र्या, नको रे मला असला नवरा ? घरात पोलीसाची धाड पडेल ना ?

नको ग असला नवरा द्वाड ॥
घरात पडेल पोलीस धाड ॥

कुत्रा– आता हा दुसरा उमेदवार बघ ? हा एक विद्वान संपादक आहे. याचे अग्रलेख विचारप्रक्षोभक व व्यासंगपूर्ण असतात. पसंत आहे ना हा ?

कुंदाराणी– गड्या कुत्र्या, संपादक नवरा घेऊन मी काय करू ? घरात किती रद्दी होईल ? रोज रोज कचरा कोण झाडून काढील ?

घरात होईल रद्दी रद्दी ।
नको ग नवरा असला कद्धी ॥

कुत्रा– आता हा तिसरा तरी पसंत आहे का बघ ! हा एक दिवाळखोर चित्रपट निर्माता आहे. याचे आजपर्यंत पंचवीस चित्रपट आपटले आहेत. याला दहा लाखाचं कर्ज आहे. चालेल तुला ?

कुंदाराणी– चालला असता पण बाई हा अगदीच बुटका याला उंचीच नाही ! कसा बरे हा जोडा शोभणार !

उंचीला हा पडतो अपुरा ।
काय करावा असला नवरा ॥

कुत्रा– बर बाई ! तुला नको तर नको हा आणखी एक नग बघ. विद्वान प्रोफेसर आहेत. उंचीहि भरपूर आहे.

कुंदाराणी– पण भारीच लांबोडे दिसतात एवढा ताडमाड उंच नवरा मला शोभणार कसा ! आणि भांडताना याची शेंडी मी कशी ओढू ?

फारच बाई याची उंची ।
कशी धरावी शेंडी याची ॥

कुत्रा– तेंहि खर ! अरेरे ! हा विद्वान प्रोफेसर केवळ उंचीमुळें फुकट गेला !

(शेवटीं कुठलाच उमेदवार पसंत नसल्यामुळे स्वयंवराचा बेत रद्द होतो. लोक कुंदाराणीचा जयजयकार करीत घरी जातात.)

□□□

## पेढे आणि पेढे ✓ : १५

" राम राम रावजी !"

" राम राम देवजी !"

" हे घ्या पेढे !"

" कशाचे हो पेढे ?"

" मुलगा झाला मला !"

" छान ! आनद ! आनद ! असेच वरचेवर या पेढे घेऊन ! काय हो देवजी, बाळबाळतीण खुशाल ना ?"

" सार काही ठीक ईश्वराच्या कृपेन ! बर येतो रावजी !"

" या बर देवजी !"

(देवजी जातो रावजी पेढे खात बसतो. गोपाळशेट येतात.)

" नमस्ते रावजी !"

" नमस्ते गोपाळशेट !"

" हे घ्या पेढे !"

" कशाबद्दल हो पेढे ?"

" मुलगा परीक्षेत पास झाला माझा !"

" आश्चर्य आहे ! एवढा मठ्ठ मुलगा पास झाला तरी कसा ?"

" म्हणूनच तर पेढे वाटतो, घ्या !"

" पण नक्की पास झाला ना ? मागाहून नापास झाल्याची तार आली तर !"

पण अगोदर पेढे खाऊन घ्या ! तोंड गोड करा."

" छान ! आनद ! आनद !"

"पण गटूमलशेटच घर फोडून ऐवज पळविणारा तूच ना ?"

"होय, पण पुराव्याच्या अभावीं निर्दोषी म्हणून माझी सुटका झाली. घ्या हे पेढे !"

"शाब्बास चोरा ! असाच वरचेवर सुटून मला पेढे देत जा !"

"निवडणुकीला उभा राहाणार आहे मी ! तुमच्या कृपेने यशस्वी झालो तर पुन्हा पेढे घेऊन येईनच"

( चोर जातो रावजी पेढे खात गाणे म्हणतात )

### पेढे-महिमा

जिकडे तिकडे पेढे पेढे
पेढ्यासाठी जग हे वेडे
आनंदाचे लक्षण पेढे
मांगल्याचे भक्षण पेढे
मुलगा झाला वाटा पेढे
पास परीक्षा वाटा पेढे
मिळे नोकरी काढा पेढे
बढती झाली तरीहि पेढे
गुरुवारी दत्ताला पेढे
नैवेद्याला पवित्र पेढे
चित्रपटाचा मुहूर्त पेढे
हार तुऱ्याच्या सर्गे पेढे
दसऱ्याचे समेलन पेढे
उद्घाटन कार्याला पेढे
जिकडे तिकडे पेढे पेढे
पेढ्यासाठी जग हें वेडें

□□□

(श्री. चमन सकाळीच उठून लगबगीने सामानसुमान बांधीत आहे. सौ. चमेली त्याच्याकडे आश्चर्याने पाहात आहे.)

चमन– चमेली, आटप लवकर

चमेली– अहो, हें माडल आहे काय तुम्ही ? सामान कशाला बांधता ?

चमन– हें घर आताच्या आता खाली केल पाहिजे. या घरात एक क्षणभर देखील राहण घोक्याच आहे

चमेली– का ? झाल तरी काय अस ?

चमन– अग, या घरात भुताटकी आहे. भूत ! भूत ! अरे बापरे ! चमेली, थोड पाणी दे मला. घसा कोरडा पडला आहे ! भूत ! भूत !

चमेली– हात्तिच्या ! कोणी सांगितल तुम्हाला इथ भुताटकी आहे म्हणून ?

चमन– मी सांगतों मी या डोळ्यांनी पाहिल आहे. या घरात भुताटकीचे भयंकर प्रकार चालू आहेत. हु ! हु ! हु ! माझी दातखिळी बसली आहे. माझ्या हातापायांना कापरे भरले आहे.

चमेली– अहो, असे घाबरता काय ? पुरुषासारखे पुरुष तुम्ही ! मी बायको घाबरत नाही, आणि तुम्ही !

चमन– चमेली, जरा जवळ ये ! तुझ्या पदराने जरा वारा घाल. आता कस राहायच या घरात ? चल चमेली, आपण पळून जाऊ.

चमेली– वा ! शहाणेच दिसता ! दोन हजार रुपये पागडी देऊन खोली घेतली, ती काय आता सोडून जाणार !

चमन– नाहीतरी या भुताटकीमध्ये राहायच कस ? चल. आपण

रस्त्यावर जाऊन राहू, पण या खोलीत नको !

चमेली– भ्रम झाला आहे तुम्हाला कसलं भूत नि कसलं काय ! काहीतरी खुळचट कल्पना ! आणि हें बघा, मी इथे असल्यामुळें भुताची काय छाती आहे येण्याची ?

चमन– मला धीर देण्यासाठी तू काहीतरी बोलतेस !

चमेली– किती शेळपट हो तुम्ही ? कुठ आहे ते भूत दाखवा. कधी भुताटकीचे प्रकार घडले सांगा पाहू ?

चमन– सांगितलं तर तुझी गाळणच उडेल. चमेली, काल रात्री या पलंगावर मी झोपलो होतो ना ? सकाळी उठून पाहतो, तों मी पलंगाखाली जमिनीवर पडलेला सांग चमेली, ही भुताटकी नाही तर काय ! पलंगावरचा नवरा पलंगाखाली कसा आपटला ?

चमेली– हात्तिच्या ! इतकच ना ? अहो, ही भुताटकीबिताटकी काहीं नाही. मीच ढकलून दिलं तुम्हाला पलंगाखाली–

चमन– शहाणी बायको दिसतेस. अंधारात असा चावटपणा करतेस काय ?

चमेली– आता तरी फिटली ना शंका ?

चमन– कशी फिटणार ? एक अंदाज चुकला, म्हणून काय ! मी नक्की सांगतो, या घरात भुताटकी आहे तू मला पलंगावरून ढकलून दिलस, हे एक वेळ खरं मानू, पण मध्यरात्री माझा गळा कोण दाबत होता ?

चमेली– अहो मीच तुम्हीं झोपेत मोठमोठयाने घोरत होता तेव्हा तुमचं नरड दाबून आवाज बंद करण्याचा मी प्रयत्न केला.

चमन– अरेच्या ! तुझेच काय चाळे ते ! भूत समजून मी किंकाळी फोडणार होतो. पण तोंडातून शब्दच बाहेर फुटेना. काय म्हणावं तुला ? मध्यरात्री नवऱ्याचा गळा दाबतेस ?

चमेली– पण तुम्ही इतकं घ्यावं कशाला ? अंधारात तुम्हाला बायकोचा हात ओळखता येत नाहीं ?

चमन– का तुझा हात काय स्त्रीचा हात आहे ? पठाणाचे हात आणि तुझे हात सारखेच. हें बघ, यापुढें माझा गळा दाबताना सांगत जा.

चमेली– आता तरी तुमच्या डोक्यातून भूत गेल ना ? चला ठेवा ते सामान !

चमन– नाही अजून एक शका आहे काय ग, काल मी हपीसातून आलो तेव्हा या कोपऱ्यात चपला ठेवल्या होत्या, पण आज सकाळी पाहतो तर त्या गेल्या गटारात ! साग, हा भुताटकीचा चमत्कार नाही तर काय ?

चमेली– देवा देवा ! आता मात्र शर्थ झाली तुम्ही इतके बावळट कसे ? अहो, मीच फेकल्या तुमच्या वहाणा गटारात ?

चमन– का म्हणून ?

चमेली– लाज नाही वाटत फाटक्या वहाणा घालून फिरायला ? कधी नवीन घेण्याची बुद्धी होते का ? लोक हसतात मला लोक म्हणतात, चमेलीचा नवरा फाटक्या वहाणाचा, मीच फेकून दिल्या त्या रागान गटारात !

चमन– तुझाच उद्योग काय हा ! मला वाटल, भुताटकीचे चाळे असावेत पाहतो तर तूच भूत !

चमेली– आता तरी सशय फिटला ना ? भुताचा भ्रम गेला ना डोक्यातून ?

चमन– अजून एक सशय आहे ही माझी शेंडी पाहिलीस ?

चमेली– शेंडी ? रोजच पाहते !

चमन– ही शेंडी कालपर्यत बारा इच लाब होती आज एकाएकी ही तीन इच कशी झाली ? हें गूढ रहस्य नाहीं का ? मला वाटत काल रात्री मी झोपेत असताना भुतानें माझी शेंडी कापली

चमेली– भुतानें नाही, मीच कापली तुमची शेंडी ! अहो, नेहमी टोपीतून बाहेर तुमची शेंडी लुडबुडत असते लोक हसतात मला

चमन– म्हणून नवऱ्याची शेंडी कापलीस ? नवरा म्हणजे तुला काय बोकड वाटला ? खुशाल त्याची मान कापावी, शेंडी कापावी !

चमेली– पण ह भुताच काम नाहीं एवढ तरी तुम्हाला समजल ना ?

चमन– आता एकच खुलासा कर काल मी एक सुदर कविता लिहून या टेबलावर ठेवली होती ती कविता आज चुलींत कशी पडली ?

चमेली– मीच टाकली ती चुलीत. तुमची कविता चुलीत जाळायची नाहीं तर काय करायची ?

चमन– अस्स काय ! एकदरीत भुताटकीचे सर्व चमत्कार तुझेच आहेत तर ! मी मात्र भलत्या कल्पनेने घाबरून गेलो होतों.

चमेली– आता आघोळ करून रामरक्षा स्तोत्र म्हणा भुताचे विचार मनातून काढून टाका आणि बायकोचेच विचार ठेवा.

चमन– तू जें जे सांगशील तें करायला मी तयार आहे आज मी तुझ्यावर खूष आहे ! माझ्या डोक्यातील भूत तू काढून टाकलस, मला आता जिकडे तिकडे बायकोच दिसत आहे. आता मी खोली बदलणार नाहीं. तुझी प्रेमळ भुताटकी मला पसंत आहे.

□□□

## जाहीर आमंत्रण

### गाढवाचा नामकरण विधि

तमाम इष्टमित्रास आणि हितचिंतकास कळविण्यात येतें कीं, श्रीकृपेंकरून आमच्या घरी पाळलेल्या गाढवीस पुत्ररत्न झालें असून त्याचा नामकरण समारंभ अमावास्येच्या शुभ रात्री करावयाचे योजलें आहे. गाढवपुत्राचें नाव ' गोपाळशेट ' असें ठेवावें, असा आमचा विचार आहे. आमची ही कल्पना सर्वांना पसंत पडेल अशी आशा आहे.

गाढवाचें बारसें मोठ्या थाटात होणार आहे. तरी या प्रसंगी आपण सहकुटुंब सहपरिवारे येऊन बालकास आशीर्वाद द्यावा, ही विनंति.

आपले

अंतूमामा आणि चिंदूकाका

ता. क. गाढवपुत्राच्या नामकरण विधीस एका खास नामवंत शाहिरानें तयार केलेला ' पाळणा ' पुढें दिला आहे.

पाळणा

सुतार उत्तमसा तुजसाठी आणियेला
पाळणा छान बनवीला ॥
जो जो रे बाळा, गर्दभ वेल्हाळा । नीज रे नीज लडिवाळा ॥
गाढविच्या तनया तुझी वाकडी मान । लांब लांब आणि कान ।
पाठीवर ओझीं अखंड वाहुनि दमला । पाळण्यात गाढव निजला ॥
सुंदर रूप तुझें गर्दभ कुलभूषणा–

जो जो रे लवकर्णा ॥
अक्कल तुज फार, पाय तसे ते चार खाशी तू निशिदिनि मार ॥
भविष्यकाळी रे । उणे नाही भाग्यास । अधिकारी होशिल खास ॥
समाजवादाची तुझी वाकडी चाल । जनतेचे करण्या हाल ॥
शाळा तुजसाठी खादीची ही वडी । वाजणार नाहीं घडी ॥
भाडवलवाले हे हार घेऊनी आले । मामा अन् काका जमले ॥
घुगुरवाळयाचा, नाच चार पायाचा । तू गाढव रे गमतीचा ॥

* * *

दे भ अतूमामा आणि दे भ चितूकाका याना त्याच्या घरच्या या मगल कार्यानिमित्त अनेक शुभसदेश आले काहीं नमुने पहा

एक दादा लिहितो–

तुमचे आमत्रण मिळाले चि गाढवबाळास प्रेमपूर्वक आशीर्वाद गाढवाला 'गोपाळशेट' हें प्रतिष्ठित नाव ठेवण्यात तुम्ही फार शहाणपणा व समतादृष्टि दाखविली याबद्दल धन्यवाद तुमच्या गाढवाचा उत्तरोत्तर लौकिक वाढो आणि त्याच्या हातून उदड लोकसेवा घडो, हीच आमची सदिच्छा !

* * *

गाढवाचा दर्जा वाढला

गणोबा गिरमिटकर लिहितात—

तुमच्या आमत्रणाबद्दल आभार पण माझा पाय मुरगळल्यामुळें मी प्रत्यक्ष नामकरण समारभास येऊ शकत नाही, याबद्दल वाईट वाटतें तुमच्या गाढवीला पुत्ररत्न झाल्याचे ऐकून आनद झाला, आणि ह्या नवजात गाढवाला 'गोपाळशेट' हें नाव ठेवल्याचे ऐकून आनदात भरच पडली गाढवाला गोपाळशेट म्हटल्याने गाढवाच्या बुद्धिमतेत काहीच फरक पडणार नसला, तरी गाढवाचा दर्जा मात्र नक्की वाढेल याची खात्री वाटते गाढव बाळाला आतापासूनच तालमीत वाढवून तयार केल्यास पुढें मार्गे तो महान् नेता म्हणून लौकिक मिळविल्याशिवाय खास रहाणार नाही गुडाच्या आणि पैशाच्या पाठबळाने तुमचा गाढव निवडणुकीत सहज विजय मिळवील, असा विश्वास आहे

□□□

## माझ्या लेखन व्यवसायाचीं बारा वर्षे : १८.

'माझ्या लेखनव्यवसायाची बारा वर्षे' असा ह्या लेखाचा मथळा आहे. पण मथळा जरी असा असला तरी त्याचा आणि विषयाचा संबंध असला पाहिजे असे नाही मथळ्याशी पूर्ण विसंगत असा मजकूर लिहिण्याची मला सवय आहे आणि माझे हे गुण ह्या लेखातहि प्रगट होतील अशी आशा आहे

एखाद्या माणसाचे जेव्हा काहीतरी छापून येते, तेव्हा लोक त्याला लेखक म्हणतात. माझेंहि बरेच छापून आले म्हणून मी लेखक झालो ह्या जगात असे कितीतरी लेखक आहेत की त्याना प्रतिभेनें निर्माण केलें नसून छापखान्यानें निर्माण केले आहे. मीहि ह्यापैकीच एक आहे.

लेखक आपल्या आयुष्यात खूप लिहितो जितका व्यासंग अधिक तितकें लेखन अधिक असे होत नाहीं तर जितके आयुष्य अधिक तितकें लेखन अधिक असेच होत असतें पण आपण कितीहि लिहिले तरी त्याचा आंढावा घेणे हें शहाण्या लेखकाचे काम नाही आपण जें काही लिहिले तें विसरून जाण्यातच शहाणपणा आहे ह्या जगात कितीतरी लेखक उजळ माथ्यानीं वावरत असतात, ह्याचे कारण आपण काय लिहिले याची त्याना आठवण नसते म्हणून! मीहि ह्यापैकीच एक आहे.

तुम्हाला खरे सांगायचे तर माझें शील आणि चारित्र्य चांगले आहे. पण शील चांगले असले म्हणजे लेखनहि चांगले असते असा नियम नाहीं. आपले कितीतरी मंत्री आणि पुढारी ह्यांचे शील चांगले आहे. पण त्यांचा राज्यकारभार कसा असतो हें आपण पाहतोच मंत्र्यांचे शील चांगले असूनहि त्याचा कारभार ज्याप्रमाणे अनेकांना पसंत नाही, त्याप्रमाणें माझें शील

चागलें असूनहि माझें वाङ्मय अनेकाना चावट वाटतें आपलें शील आणि आपले कर्म ह्याचा मेळ नेहमीच बसतो असे नाहीं

तुम्हाला आणखी खाजगी सागू का ? मी वाङ्मयप्रेमी माणूस नाहीं असे असूनहि मी लेखन करतों आहें माझ्या पत्नीवर माझें प्रेम नसूनहि माझा ससार उत्तम चालला आहे, तसेच वाङ्मयावर माझें प्रेम नसूनहि माझें लेखन सुरळीत चालले आहे एखादी गोष्ट करावयाला प्रेमाची किंवा निष्ठेची आवश्यकता आहे असे मला वाटत नाही निदान लेखकाच्या बाबतीत तर कशाचीच आवश्यकता नाहीं

मी विनोदी लेखक आहे असे म्हणतात आणि तें खरेहि आहे, कारण मला असे अनेक लोक भेटले की ज्यानीं माझे लेख मलाच वाचून दाखवून बेफाम हास्याचे प्रदर्शन केले. हा धडधडीत पुरावा उघड्या डोळ्यानी पाहिल्यावरहि मी विनोदी लेखक नाही असे मी कसे म्हणू ? पण मी स्वतः जेंव्हा माझे लेख वाचतो तेंव्हा कुठें हसावें आणि कुठें रडावे तेच मला कळत नाही मी विनोदी लेखक असलो तरी मला विनोदबुद्धि बरीच कमी आहे हें मी कबूल करतो

मी जसे विनोदी लेख लिहिले तसेच शेंकडो रुक्ष आणि कटाळवाणे लेखहि लिहिले आहेत आणि यापुढें एकापेक्षा एक भयकर लेख लिहिण्याची मला हिंमत आहे पण मी कितीहि नीरस आणि रटाळ लेखन केलें तरी विनोदी लेखक म्हणून माझ्या कपाळीं जो शिक्का बसला आहे तो धुवून जाईल असे मला वाटत नाही एकदा चोर म्हणून ठरलेला माणूस जसा जन्मभर चोरच, तसा एकदा विनोदी लेखक म्हणून ठरलेला माणूस जन्मभर विनोदी लेखकच ! तरी पण विनोदी लेखक म्हणून मी मिळविलेली कीर्ति घालवून बसण्यासाठीं माझे अखड प्रयत्न चालू आहेत

आयुष्याची वर्षें मोजणे मला पसत नाही पण कधी कधी कुणी विचारले म्हणजे वय सागावे लागतें स्त्रियाना मी माझें वय पचवीस सागत असतो आणि पुरुषाना मी माझें खरे वय चाळीस सागतो पण काहीहि असले तरी मी स्वतःला तरुण समजूनच सगळे धदे करतो

माझ्या समजुतीप्रमाणे मला बरेच दीर्घायुष्य लाभले आहे. ह्या जगात

माझ्यासारख्या निर्धन आणि बावळट माणसाने चाळीस वर्षे जिवंत रहावे हा चमत्कारच होय मुदतीच्या बाहेर हें प्रकरण गेले असेच मला वाटतें

रस्त्यात चालताना मी मागें वळून पाहात नाही, आयुष्याकडेहि मी मागें वळून पाहत नाही किती वर्षांपासून मी लेख लिहिण्याचे धंदे करीत आहे तें मला नक्की सांगता येत नाहीं पण लेख लिहिण्याची अक्कल येण्यापूर्वीच जसे मी एका पोरीवर प्रेम केले, तशीच लेख लिहिण्याची अक्कल येण्यापूर्वीच मी त्या क्षेत्रात लुडबुड केली अवेळीं प्रेम केलेली मुलगी काही दिवसानी मला सोडून गेली, पण अवेळी उचललेली लेखणी माझ्या जन्मालाच चिकटली !

माझ्या लेखनाचा प्रारंभकाळ कोणताहि असो, पण अलीकडच्या ह्या बारा वर्षांतच मी खरा लेखक झालो असे म्हणावयास हरकत नाही. कारण ह्या बारा वर्षांतच माझे बरेच लिखाण छापून आले आहे गेल्या बारा वर्षांत माझीं बारा पुस्तके दलाल आणि मुळगावकर ह्याच्या सुंदर चित्रासह प्रसिद्ध झाली आहत शिवाय, वृत्तपत्रातूनहि मी विपुल लेखन केले आहे. म्हणून या बारा वर्षांच्या कालखंडाकडे मी गंभीरपणे पाहतों. गेल्या बारा वर्षांत मी काहीतरी ' भरीव ' म्हणजे पोट भरण्याजोगें लेखनकार्य केले आहे, हें निर्विवाद सत्य होय माझ्या लेखनामुळें मराठी वाङ्मयात भर पडली नसेल, पण माझ्या संसारात मात्र चांगलीच भर पडली

गेल्या बारा वर्षांत मी जो लेखनप्रपंच केला, त्याचा आढावा मी घेणार नसून, केवळ पश्चात्ताप व्यक्त करण्यासाठीच मी हा लेख लिहीत आहे पश्चात्ताप ? आणि लेखनव्यवसायाबद्दल ? लेखन म्हणजे काय वाईट कर्म आहे की त्याबद्दल पश्चात्ताप करावा ? लेखन म्हणजे काय गुन्हा आहे, पाप आहे, कीं काळाबाजार आहे म्हणून त्याबद्दल मला हळहळ वाटावी ?

आणि लेखकानें पश्चात्ताप करण्याची मुळी जरुरीच काय ! पश्चात्ताप वाचकानीं करावयाचा असतो पश्चात्ताप. प्रकाशकानी करावयाचा असतो लेखकाचीं पुस्तकें विकत घेण्याच्या गिन्हाइकानी पश्चात्ताप करावयाचा असतो लेखकानें पश्चात्ताप का करावा ? त्यात त्याचे काय नुकसान आहे ? लेखकानें फक्त लिहावयाचे असतें पश्चात्ताप इतरानी करावयाचा असतो

पण हा व्यवहारी हिशेब झाला नैतिक आणि आध्यात्मिक दृष्टीनेहि विचार झाला पाहिजे बारा वर्षे लेखनप्रपच करून मी काय मिळविले? पैशाच्या रुपानें मोबदला मिळाला असेल, पण आत्म्याला काही साक्षात्कार झाला काय? जीवनाचा विकास साधला काय? हृदयाला शाती लाभली काय? ह्याचे उत्तर माझा दुखी आणि रडवा चेहराच देईल लेखनव्यवसायात पडण्यापूर्वी मी कसा होतो आणि आता त्यात पडल्यानतर माझें झाले काय? माझ्या जीवनाचा आनद नष्ट झाला आत्म्याची शाति मी गमावून बसलो मी लेख लिहित नसून भलताच उपद्व्याप करीत आहें असेच मला वाटू लागते प्रत्येक लेख लिहिताना कुठेंतरी काहीतरी चुकत असल्याचा भास होऊन हृदय कासावीस होतें लेखकाला मानसिक आनद लाभत असतो अस म्हणतात, पण माझ्या बाबतीत ही मानसिक विवचना झाली आहे माझ्या कोणत्याहि लेखानें माझें समाधान झाले नाही एकदा लिहिलेला लेख पुन्हा वाचण्याचे मला धाडस होत नाही.

लेखनाचा भलता उद्योग करून मी माझ्या आयुष्यातील बारा वर्षे फुकट घालविली याबद्दल मला हळहळ वाटते! गेल्या बारा वर्षांत मी लिहिलेले खडोगणती लेख आठवले म्हणजे मी काय भयकर गाढवपणा केला असे वाटून माझें अत करण व्यथित होतें प्रत्येक लेख लिहिताना मी काहींतरी पापकर्म किंवा घातपाती कृत्य करीत आहे, असा भास होऊन माझ्या हातातून लेखणी गळून पडते! अर्ध्या लेखावरून उठून मी इराण्याच्या हॉटेलात जातो आणि हृदयाची टोचणी शात करण्याचा प्रयत्न करतो कधी कधी लेख लिहिताना डोक्यात आत्महत्त्येचे विचार येतात, पण माझी जागा भरून काढणारा विनोदी लेखक जन्मास येण्यापूर्वीच मी मरून जाणे योग्य नाहीं असा विचार करून मी गप्प बसतो अन्नूने जगता येण्यासारखे इतर धदे सोडून मी हा लेखनाचा धदा पत्करला, याबद्दल मला पश्चात्ताप होतो पण कोणतेच धदे करण्याची पात्रता नसलेला माणूस दुसरे काय करणार? नालायक माणूस शेवटी लेखक बनतो तो हा असा!

स्फूर्ति की काय म्हणतात तिचा अनुभवहि मला कधी आला नाही स्फूर्तीचा गध नसताना गेली बारा वर्षे मी लेखक म्हणून मिरवतो आहे, हें कबूल करण्यास मला लाज वाटते पण तें सत्य आहे स्फूर्तीशिवाय लेखन

करू नये असे मी लोकांना सागतो, पण मी स्वत मात्र त्या तत्त्वाचे पालन करीत नाही माझ्याजवळ स्फूर्तीचा जसा अभाव आहे तसा प्रतिभेचाहि ठणठणाट आहे असे असूनहि बाजारात माझ्या वाङमयाला बरीच मागणी आहे माझ्या यशाचे रहस्य कशात आहे ते मी ओळखले ! स्फूर्ति आणि प्रतिभा याच्यावर सपूर्ण बहिष्कार घालूनच मी लेखन करीत असतो

लेख लिहावयाला बसताना मला नेहमी मळमळल्यासारखें होत असतें त्यावेळीं माझा चेहरा अत्यत रडवा आणि सुतकी बनतो डपाळावर आठयाचीं कोळिष्टकें चढतात डोके सुन्न होतें डोळे जड होतात कठ दाटून येतो हृदय कलकलायला लागतें मलेरिया किंवा टॉयफाईड याची लक्षणे माझ्या प्रकृतीत दिसू लागतात आणि ॲस्प्रोच्या गोळया घेऊन मी लेखणी चालू करतो वास्तविक विनोदी लेखकाला ही बैठक विसगत आहे हजारो वाचकाना खदखदा हसावयास लावणारे लेख काय अशा रडव्या चेहऱ्यानें, मळमळलेल्या अत करणाने आणि शन्य डोक्याने लिहावयाचे असतात ! पण माझ्या लेखनकौशल्याचे हेंच तर लक्षण आहे रडवा चेहरा केल्याशिवाय मी विनोदी लेख लिहूच शकत नाहीं सोनापुरात नुकताच कुणाला तरी पोचवून आलो आहे अशी मुद्रा धारण करूनच मी लेखनास प्रारभ करतो

गेल्या बारा वर्षांच्या लेखनव्यवसायामुळें माझ्या डोक्यावर आणि स्मरणशक्तीवर गभीर परिणाम झाला आहे बारा वर्षांपूर्वी माझ डोकें जसे शाबूत होतें तसे ते आज नाहीं ते साफ कामातून गेले आहे पचवीस वर्षे आणि पन्नास वर्षे लेखन करूनहि डोकें धड असलेले हजारो साहित्यिक ह्या भूतलावर आहेत पण माझें डोक मात्र अवघ्या बारा वर्षांत निकामी व्हावे हें नवल नाही काय ? माझ्या लेखनाचाच हा परिणाम असावा

पण असे डोके घेऊनसुद्धा मी अजून लेख लिहू शकतो, ह्यावरून डोक्याचा आणि लेखनाचा फार सबध नाहीं हेंहि सिद्ध होतें

बारा वर्षांच्या वाङमयसेवेने माझें डोके जसे कामातून गेलें तशी माझी स्मरणशक्तीहि मला सोडून गेली आहे काल काय बोललों याची मला आज आठवण राहात नाही माझी स्मरणशक्ति मला पदोपदीं दगा देत असते लेखन करताना मुख्य विषयाचेहि मला भान रहात नाहीं, म्हणून नेहमीं

मुद्दा सोडून मी भलत्या ठिकाणीं वाहत जातो कोणत्या विषयावर मी लिहित आहे हें मी अजिबात विसरून जातो तंत्रदृष्टया तें चूक असेल, पण त्यामुळें विनोद मात्र हमखास निर्माण होतो माझ्या वाङमयीन यशाचें हेंहि एक रहस्य असावें

लेखनात काय जादू आहे कळत नाही कारण लेखनाचा पेशा पत्करल्यापासून माझ्या अंतरंगाप्रमाणे बाह्यांगातहि खूपच उलथापालथ झाली आहे माझ्या रूपरंगात विलक्षण क्रांति झाली आहे एके काळचा माझा प्रेक्षणीय चेहरा आज भकास आणि भयानक दिसत आहे डोक्यावरचा वाकडा भाग जाऊन त्या ठिकाणी पिंजारलेल्या केसाचे अस्ताव्यस्त जगल माजले आहे शरीराची ऐट मोडकळीस आली आहे कबर खचली आहे डोळे तारवटले आहेत लेखनाचा छंद लागल्यापासून चेहऱ्यावर एक प्रकारची नैसर्गिक अवकळा पसरली आहे माझा हा अवतार पाहिला म्हणजे मी सरस्वतीचा उपासक आहे कीं सैतानाचा उपासक आहे तेंच कळत नाहीं

लोक मला जास्त ओळखतात ते 'सख्याहरी' चा लेखक म्हणून 'सख्याहरी' हें प्रकरण आता शिळे झाले असले आणि त्या गोष्टीला आज बारा वर्षे झाली असली तरी अजून मी त्या एकाच पराक्रमावर भाव खात आहे 'सख्याहरी' हे सदर मी 'चित्रा' साप्ताहिकातून सुरू केले 'सख्याहरी' ची किर्ति फार दूरवर पसरली ह्या वाङमय प्रकाराने असंख्य वाचकाना वेड लावले कॉलेज कुमारांपासून पानवाला, गडेरीवाला, सलूनवाला वगैरे सर्वच वाचकवर्गामध्यें 'सख्याहरी'चा बोलबाला झाला

वास्तविक 'सख्याहरी' म्हणजे काही असामान्य कलाकृति नव्हे, किंवा 'सख्याहरी' चा जनक हा मोठा प्रतिभाशाली लेखक नव्हे पण 'सख्याहरी' मध्यें काहीतरी जादू होती खास त्या काळात तो एक खळबळजनक नवीन वाङमयप्रकार वाटला उपरोध, विनोद, टवाळी, कोटचा, शृंगार, लाडिकपणा, नखरा, भाषाशैली वगैरे अनेक साहित्य गुणानीं आणि दुर्गुणानीं 'सख्याहरी 'ला बेफाम रंग चढत होता पतिपत्नीना आणक-माशुकाना आपल्या दैनंदिन जीवनातल्या गमती 'सख्याहरी' मध्यें पहावयास मिळाल्या भानगडी करणाऱ्या लोकाना आपले प्रतिबिंब 'सख्याहरी'मध्यें दिसू लागले राजकरणातील रगडगापासून साहित्य समेलनातील आबे, वेणी, लोणी, इत्यादि प्रकारा-

पर्यंत अनेक विषयाचा 'सख्याहरी'ने समाचार घेतला

,' ' लोक 'सख्याहरी' चे कौतुक करून नुसते गप्प बसले नाहीत, तर 'सख्याहरी'च्या लेखकाचे दर्शन घेण्यासाठी हळूहळू पाहुणे येऊ लागले तेव्हा मी घाबरून गेलो 'सख्याहरी'चा लेखक कसा दिसतो तें पाहण्यासाठी बऱ्याच जणामध्यें कुतुहल निर्माण झाले असल्यास नवल नाही ज्याची आपण कीर्ति ऐकतो तो माणूस कशा प्रकारचा असावा असे वाटणे स्वाभाविक आहे पुण्या, मुंबईचे कितीतरी लोक मला पाहायला येत असत, इतकेंच नव्हे तर नागपूर, इंदूर, कराची वगैरे दूर दूर गावचे लोक मुंबईत येऊन राणीचा बाग पाहिल्यानतर 'सख्याहरी'च्या लेखकाला पाहण्याची इच्छा बाळगू लागले !

पण मला पहावयास जे लोक आले त्याची निराशाच झाली त्याच्या अपेक्षेप्रमाणे माझा चेहरा किंवा पोशाख नव्हता 'सख्याहरी'चा लेखक इतका बावळट असू शकेल याची त्याना कल्पनाच नव्हती माझा एकदर अवतार पाहून त्याना धक्का बसला ' माझी भकास मुद्रा, वाढलेली दाढी अन् गबाळा वेष पाहून कित्येकानीं तोंडात बोटेंच घातली !

फार थोडे समजूतदार होते ते मात्र म्हणाल, ' खरा कलावत असाच असतो त्याला कपड्याचे आणि बाह्य डामडौलाचे काय होय ! ता आपल्या तर्हेतच असायचा !"

काहीं जणानी माझ्या साधेपणाची तारीफ केली 'साधी राहाणी, उच्च विचारसरणी' असे ते म्हणू लागले काही जणाना माझ्या बावळटपणामध्यें विद्वत्ता आणि नम्रता याचा साक्षात्कार झाला पण एकदरींत मला भेटलेले बहुसख्य लोक नाखुष होऊन गेले यात सशय नाही. माझ्या दर्शनानें त्याचा अपेक्षाभग झाला मला जवळून पाहण्यापेक्षा माझे लेख लाबून वाचलेले बरे हेंच शेवटीं त्याना कळून आले.

माझ्या एकदर लिखाणावरून मी एखादा रगेल गडी असावा अशी बऱ्याच वाचकाची समजूत आहे पण ही कल्पना चुकीची आहे माझ्याइतका रुक्ष आणि अरसिक माणूस तुम्हाला सापडणार नाही माझ्या चेहऱ्याप्रमाणेंच माझी प्रकृतीहि गभीर आहे मी ललित लेखक आहे, पण माझ्या जीवनात लालित्य नाही. नाट्य, काव्य, सगीत याची मला आवड नाही. माझ्या

वाङमयात प्रणयाचे चाळे असतात, पण मी स्वतः त्या चाळयापासून अलिप्त असतों. थोडक्यात सांगायचे म्हणजे मी एक रूक्ष आणि अरसिक माणूस आहे लेखकाचे जीवन त्याच्या वाङमयात पाहण्याचा प्रयत्न काही जण करतात, पण माझें जीवन हें माझ्या वाङमयाच्या अगदीं विरुद्ध आहे.

म्हणजे मी आयुष्यात काही रगडग केले नाहीत असे समजण्याचे कारण नाहीं पण मी जें केले आहे तें माझ्या वाङमयाच्या मानाने फार थोडें आहे केलें थोडें आणि सांगितले फार अशीच अवस्था झाली आहे.

असो, माझ्या लेखनव्यवसायाची बारा वर्षे हा हा म्हणता निघून गेली. बारा वर्षे लेखन करून मी काही शहाणपणा शिकलों काय ? नाही. पुढील बारा वर्षेंहि मी हाच उपद्व्याप करणार आहे. जित्याची खोड मेल्यावाचून जाणार कशी ?

ह्या लेखनव्यवसायात पडण्यापूर्वी मी किती सभ्य माणूस होतो ! किती अब्रूदार गृहस्थ होतो ! पण आज मला सामाजिक मत नाही मानसिक समाधान नाही इहलोकी सौख्य नाही आणि परलोकी मोक्ष नाही, अशी अवस्था झाली आहे तरीपण मी महाराष्ट्राचा एक विनोदी लेखक आहे आणि माझ्या बुद्धीचे व अब्रूचे वाटोळे झाले असले तरी माझें पवित्र कर्तव्यकर्म बजावण्याच्या जबाबदारीने मी माझे लेखनकार्य चालूच ठेवीन. असे मी वाचकाना आश्वासन देतो.

□□□

( स्थळ – ' वेडापार ' मासिकाची कचेरी ' वेडापार 'च्या दिवाळी अंकाचा प्रकाशन-समारंभ सुरू आहे अध्यक्षस्थानी श्री रहेमान रद्दीवाला हे हातात वजनाचा काटा घेऊन अंकाचे वजन करीत बसले आहेत व्यास-पीठावर लेखक, एजंट, चित्रकार, कागदाचा व्यापारी, छापखान्याचा मालक वगैरे वृत्तपत्रव्यवसायाशी संबंध असलेले सद्‌गृहस्थ बसले आहेत )

*संपादक.*– बंधूंनो आणि भगिनींनो, आज ' वेडापार ' मासिकाचा हा दिवाळी अंक वाचकांच्या हातात देताना मला अतिशय आनंद होत आहे. तुम्हाला तो हातात घेताना काय वाटत असेल ते मी सांगू शकत नाहीं. या अंकाचे उद्‌घाटन करण्याची विनंती मी जरीपुराणवाले रहेमान रद्दीवाला ह्यांस केली आणि त्यांनी ती मोठ्या आनंदाने मान्य केली, याबद्दल मी त्यांचा आभारी आहे ! ह्या खास अंकाला पहिला हात त्यांचा लागला हें मी माझें भाग्य समजतो हा अंक ज्या स्वरूपात तयार झाला आहे, त्याला मी एकटाच सर्वस्वी जबाबदार नाही अनेकांचे श्रम किंवा आळस ह्याचा हा परिपाक आहे कुणी रात्रंदिवस खपून तर कुणी झोपून मला मदत केली आहे. हा अंक तयार करण्याच्या कामी ज्यांनी ज्यांनीं माझ्या डोक्यावर उपकारांचे, तसेच कर्जाचे डोंगर करून ठेवले, ते सर्व माझे हितचिंतक आज या ठिकाणीं व्यासपीठावर उपस्थित आहेत मी एकटा संपादक काय दिवे लावणार ? माझ्या पाठीशीं जर एजंट नसता, चित्रकार नसता, कागदाचा व्यापारी नसता, छापखान्याचा मालक नसता, कवी आणि लेखक नसता तर हा दणदणीत दिवाळी अंक मी काढू शकतो काय ? मला एकटपालाच

शिव्या देणाऱ्या वाचकानी ह्या सर्व गोष्टींचा विचार करावा, अशी माझी विनंती आहे

सभ्य गृहस्थ हो, दिवाळीच्या आनंदात आमच्या खास अकानें जी बहुमोल भर घातली आहे तिचे सारं श्रेय आज व्यासपीठावर दिसणाऱ्या मंडळींनाच देणे भाग आहे वृत्तपत्रव्यवसायाचे ते खरे आधारस्तंभ आहेत दिवाळी अकाचे तेच खरे निर्माते आहेत, ह्या अकात जें काही चागलें असेल तें त्याचे, वाईट असेल तें माझें ! फायदा असेल तो त्याचा कर्ज असेल त माझें ! ह्या सर्व थोर सज्जनाचे मी आभार मानतो

सर्वांत प्रथम आभार मानायचे तर ते लेखकाचे कारण वाचकाशी त्याचा प्रत्यक्ष संबंध येतो आणि वाचकाच्या जास्त शिव्या त्यानाच खाव्या लागतात लेखकाच्या प्रेमळ सहकार्याशिवाय दोनशे पानाचा हा जाडजूड अंक भरून काढणें मला शक्य झाले नसते कोरेच कागद तुमच्या हाती द्यावे लागले असते काही वाचक म्हणतात, कोरे कागद चालतील ! पण अजून आपल्या दिवाळी अकाच्या स्वरूपात तितकी क्रांति झाली नाही हळूहळू तो दिवस केव्हातरी येईल पण लेखकाची दुसरी सोय केल्याशिवाय अशी क्रांति करणेंहि इष्ट नाही वाचकहो, ह्या अकातील चित्तवेधक कथा, भावरम्य कविता, बहारदार ललित साहित्य वगैरे वगैरे वाचून काढण्याची जबाबदारी आता तुमच्यावर आहे तुमच्या सहनशीलतेवर माझा पूर्ण विश्वास आहे मी स्वत एकहि लेख वाचला नाही जसजसा माल येत गेला तसतसा अकात छापून टाकला आणि माझ्या संपादकीय जबाबदारीतून मोकळा झालो लेख वाचण्यापेक्षा जास्त महत्वाची कामें संपादकाला असतात, हे या व्यवसायात पडल्याशिवाय तुम्हाला कळायच नाही असो, पुन्हा एकदा मी लेखकाचे मनःपूर्वक आभार मानतो मी दिवाळी-अंक काढणार अशी जाहिरात वर्तमानपत्रात येताच शहरातील कित्येक लेखक परागंदा झाले आणि कुठे कुठें दडी मारून बसले त्या सर्वांचा शोध लावणे अतिशय अवघड काम होते जे थोडे लेखक माझ्या हाती सापडले ते माझ्या दिवाळी-अकाला बळी पडले किंवा त्याच्या साहित्याला मी बळी पडलो हा अंक वरवर जरी चाळला तरी, तुम्हाला माझें बलिदान दिसून येईल दिवाळी-अकाचा संपादक हा हुतात्मा असतो दर दिवाळीला तो ठार होतो, पुन्हा दुसऱ्या दिवाळीला

जिवत होतो व पुन्हा ठार होतो जनन–मरणाचा हा फेरा कधीच टळत नाही. ह्या अकात दीड ओळीचीसुद्धा एक कविता आहे दीड ओळीच्या या कवितेसाठी दीड महिना मला धक्का खावा लागला लेखक हा घरदार करून राहणारा प्राणी असला तरी तो आपल्या घरी कधींच नसतो लेखकाला हुडकून काढणे हें एक तत्र आहे डोंबिवलीचा लेखक कादिवलीला सापडायचा, कादिवलीचा लेखक डोंबिवलीला आढळायचा, माहीमच्या हातभट्टीवर दोन कवि आणि केळेवाडीच्या गल्लीत तीन लेखक मी मोठ्या शिताफीनें पकडले. एका गाफील कवीचा तर खिसा कापून मला त्याची कविता मिळवावी लागली, हे सगळें सागण्याचे कारण, हा अक काढण्यासाठीं सपादकाला किती आटापिटा करावा लागला ते तुमच्या लक्षात यावे ! एवढी दगदग सोसूनहि काही निष्पन्न झाले म्हणता काय ? व्यासपीठावर आमचे एजट बसले आहेत, त्याचा उतरलेला चेहरा पहा आणि काय ते ओळखा !

आमचे चित्रकार रुसलेले दिसतात ! बरोबर आहे मुखपृष्ठावर बहुरगी चित्र काढून देणाऱ्या चित्रकाराची प्रथम दखल न घेता मी लेखकाचेच गोडवे पहिल्याने गायिले, याचा त्याना राग येणें स्वाभाविक आहे मी लेखकाचेच आभार प्रथम का मानले ? कारण तो दलित वर्ग आहे आपणसुद्धा समाजवादी ढगाने वाटचाल करतो हे लक्षात ठेवा शिवाय, हा अक पाडण्याच्या कामी लेखक मडळींनी फार मोठा हातभार लावला आहे लेखकानीं पाडलेला अक अधिक पाडण्याचे काम–माफ करा, सावरण्याचे काम–चित्रकारान केले, याबद्दल मी त्याला धन्यवाद देतो ह्या अकाचे विलोभनीय आकर्षण काय ? मुखपृष्ठावरील तीन रगी तरुणी ! किती मस्त आणि बेफाम चित्र आहे ? अक हातात धरावासा वाटतो तो ह्या चित्रामुळेंच ! कित्येक गिऱ्हाइके सर मव्हर फाडून घेऊन अक परत देतात एरव्हीं चित्रातली ही तरुणी कुणी उचलली नसती, पण अगावरील तलम, पारदर्शक वस्त्रामुळे तिचा भाव वाढला आहे अस्ताव्यस्त पदरामुळें तिच्या उन्नत उरोजाकडे तुम्ही तास तास पाहू शकता ! ती काहीं पदर सावरणार नाहीं कुणाहि सभ्य स्त्रीचा पदर बाजूला खेंचण्यात आमचा चित्रकार पटाईत आहे कारण चित्रकलेच्या विकासाला पदराचे दडपण मारक आहे

चित्रातील तीन रगी सुदरीकडे लोचटपणे पहाण्याची फार सोय, नाहीं

तिचा एक दंड सुजलेला तुम्हाला दिसेल. सूज आलेल्या हाताकडे दुर्लक्ष करून आपण तिच्या पायाकडे वळलों तर एक पाय दुसऱ्या पायापेक्षां लहान असल्याचें पाहून आपल्याला धक्काच बसेल. बाई लंगडी असावी हे उघड आहे. बाईच्या सुंदर चेहेऱ्यावर देवीचे वण दिसतात, तो छपाईचा दोष की चित्रकाराचीच करामत तें नक्की सांगता येत नाही. अंकातील चित्रेंहि नमुनेदार आहेत. 'रामपंचायतन' ह्या चित्रात राम कोण आणि मारुती कोण हें फक्त शेपटीवरून ओळखता येते. 'शिव–पार्वती नृत्य' ह्या चित्रांतील पार्वती इतकी लठ्ठ आहे की, वजन घटवण्यासाठीच ती तांडव नृत्य करीत असावी असे वाटू लागतें. वाचकहो, माझ्या दिवाळी अंकावर चित्रकारानें जे संस्कार करून ठेवले आहेत, त्याचें वर्णन मी काय करूं? आपल्या कुशल कुंचल्यानें माझ्या तोंडाला काळे फासण्याचेंच त्याने बाकी ठेवले आहे.

लेखक आणि चित्रकार हे कलावंत, पण वर्तमानपत्राचा एजंट हा काही कलावंत नाही. पण तो कलाप्रेमी आहे. दिवाळी अंकात कोण कोण लेखक आणि कोण कोण चित्रकार आहेत याची सूक्ष्म चिकित्सा करून तो अंकाची मागणी करतो. दिवाळी अंकाचे गठ्ठे उचलून नेऊन छापखान्यातील अडगळ तोच दूर करतो. दिवाळी अंकाचे विकेंद्रीकरण करून, साहित्याचा घरोघर प्रसार करतो. गिऱ्हाइकाच्या गळ्यात अंक बांधून मालाचा उठाव करतो. आम्ही करून ठेवलेला गोंधळ शेवटी तोच निस्तरतो, हे त्याचे केवढे मोठे उपकार! म्हणून मी माझ्या परोपकारी एजंटाचे या प्रसंगी आभार मानतों.

वर्तमानपत्राचा एजंट हाच आमचा आश्रयदाता! मला जो एजंट भेटला तो अतिशय सज्जन आहे. अवघ्या चाळीस टक्के कमिशनवर तो माझे अंक खपवितो. उरलेल्या साठ टक्क्यांपैकी तीस टक्के बुडवतो आणि तीस टक्के संपादकाच्या हातावर ठेवतो. वास्तविक, एजंट ह्या नात्यानें सगळेच पैसे बुडविण्याचा त्याला हक्क असूनहि तो काही रक्कम उदारपणें आणून देतो, हा त्याचा त्याग वाखाणण्यासारखा आहे. वर्तमानपत्राचा धंदा हा वादग्रस्त विषयाचा आहे. संपादकाचे पैसे एजंट बुडवितो की एजंटाचे पैसे संपादक बुडवितो हा वादाचा प्रश्न आहे. दोघेहि परस्परांवर आरोप करतात. हिंदुस्थान आणि पाकिस्तान ह्यांच्यामधल्या प्रेमळ भांडणासारखंच हें एक

गोड भाडण आहे. पण एवढे मात्र खरे की, एजट संपादकाला उपाशी मरूं देत नाही. त्याला जिवत ठेवण्याची कोशीस करतो कारण, सपादक जिवत राहिला तरच पुढील वर्षी नवा दिवाळी अक निघू शकतो आणि धंदा चालू राहतो माझे बाहेरगावचे एजटहि असेच कनवाळू आहेत. ते तत्परतेने चेक पाठवितात, पण बँकेकडून त्या चेकचा स्वीकार होत नाही; त्याला कोण काय करणार ?

दिवाळी अक कारखान्यातून पक्का होऊन बाहेर पडण्यापूर्वी त्याला कच्चा माल कोण पुरवितो ? कागदवाला ! दोनशें पानाचा हा जबरदस्त अक कागदाशिवाय तयार झाला असता काय ? कागद नसता तर लेखकाचे लेख, कवीच्या कविता, चित्रकाराचीं चित्रें आम्ही कशीं छापलीं असती ? कागद हा वृत्त-व्यवसायचा मूलाधार आहे. आज ह्या ठिकाणी व्यासपीठावर माझे मित्र फोकटलाल पेपर मर्चट गभीर मुद्रा करून बसले आहेत. कारण, आपली उधारी कशी वसूल होईल, याची त्याना चिंता पडली आहे आजच्या सभेला आमत्रण नसताहि ते धावून आले आहेत आणि आता माझ्याशीं हुज्जत घातल्याशिवाय ते निघून जातील असे वाटत नाही. दर दिवाळीनतर ते मला कोर्टांत खेंचतात, पण आमचे सबंध काही बिघडले नाहीत. उभयताना एकमेकाची जरूरी भासते. माझी अडचण लक्षात घेऊन शेठजी आपला फडतूस, कनिष्ठ दर्जाचा कागद दुप्पट भावानें माझ्या पदरीं बाधतात वाचकहो, ह्या अकाचा कागद करपलेल्या पापडासारखा तुम्हाला दिसेल. अकातील कांही कागद फाटलेलेहि आहेत. असा हा फाटका–तुटका अक माझ्या उदार पेपर-मर्चंटाच्या कृपेमुळेंच निघाला हें सागण्यास मला अभिमान वाटतो. हा अक तयार होत असताना शेठजींना वेळोवेळी कागदाचा पुरवठा बंद करून माझी जी अडवणूक केली, त्यामुळेंच अकाला उशीर होऊन वाचकाची उत्कठा वाढली.

ह्या अकातील बराचसा कागद पतंगाचा आहे अक चाळताना मधून मधून निळे, जाभळे, वगैरे रंगीबेरंगी कागदाची शोभा तुम्हाला आढळून येईल वाचकहो, तुमच्या मुलाना पतगासाठी या कागदाचा उपयोग होईल. किंवा दिवाळीच्या आकाशदिव्यासाठीं तो वापरता येईल. कागदासबंधीं मी जास्त बोलत नाही. कागद कसलाहि असला तरी मला हा माल पुरविणारा

व्यापारी फार दयाळू आहे माझ्यावर त्याचे फार ऋण आहे. त्याच्या ऋणातून मुक्त होण्याची माझी इच्छा नाहीं पण तेच मला कोर्टात खेंचून ऋण फेडण्यास भाग पाडतात, हें दुर्दैव होय

फोकटलाल पेपर मर्चंट याच्याप्रमाणेच महमदभाई वेफर मर्चंट ह्याच्या मी फार आभारी आहे अंकाच्या लास्ट कव्हरला फुल पेज जाहिरात देऊन त्यानी माझ्यावर मोठीच मेहरबानी केली आहे बटाट्याचे वेफर्स विकून महमदभाईंनी बिल्डिंग बांधली आहे त्याचे वेफर अतिशय लोकप्रिय आहेत दर वर्षी दिवाळीला ते मला पानभर जाहिरात देतात आणि ज्या ज्या वेळी मी जाहिरातीचे पैसे वसूल करावयास जातो, त्या त्या वेळीं माझ्या हातावर वेफरचा पुडा ठेवून माझी बोळवण करतात माझे दुसरे जाहिरातदार घाशीराम श्रीखंडवाले ह्यानी पाव पान जाहिरात देऊन मला उपकृत केले आहे ही जाहिरात मिळविण्यासाठी खटपट करावी लागली श्रीखंडवाल्याची ओळख करून घेण्यासाठीं त्याच्या दुकानात सात आठ वेळा खेपा मारून श्रीखंड विकत घ्यावे लागले घाशीरामच्या मुलाची कविता दिवाळी अंकात छापण्याची हमी दिली घाशीरामच्या मुलीच्या लग्नाला चांदीचा पेला अहेर म्हणून दिला इतके सगळे झाल्यावर पाव पान जाहिरात पदरात पडली माझ्या इतर छोट्या मोठ्या जाहिरातदाराचेहि कृतज्ञतापूर्वक आभार मानतो अंकाची जागा अडविण्यास त्याची खूपच मदत झाली. 'उधार साडी स्टोअर्स', 'ब्रम्हचारी सावण', 'सुकामेवा ट्रेडिंग कंपनी', 'गोल माल फीलम कंपनी', 'श्रोट कटस स्वेडस्' आणि किती नावं सांगू? तुम्हीच अंकात पहा 'अत्तर ताडी' ही नवीनच जाहिरात ह्या वर्षी आहे ताडीपासून बनविलेले तें एक नमुनेदार अत्तर आहे पोलिसाची धाड पडली नाही तरच जाहिरातीचे पैसे मिळतील ह्या अटीवर ती जाहिरात स्वीकारली आहे 'गोलमाल फिल्म कंपनी'ची एक पान जाहिरात या अंकात आहे खरी, पण ती कंपनी कुठें आहे याचा पत्ताच लागत नसल्यामुळें वसुलीचा प्रश्नच निर्माण होत नाहीं

किरकोळ जाहिरातींपेक्षा ठोक जाहिराती देणारा एजंट हा वृत्तपत्र व्यवसायाचा सदा कैवारी आहे भाडवलशाही युगात शब्दाचे उलट अर्थ होतात म्हणून 'कैवारी' याचा अर्थ 'हितशत्रू' असाहि होऊ शकतो. पण मी मात्र

चांगल्या अर्थानेंच हा शब्द वापरतो जाहिरातीचा एजट हा इतर एजटा-प्रमाणे फक्त कमिशन खाणारा दलाल नाही तो सगळेंच खातो असे म्हणतात. पण माझा माझ्या एजटावर विश्वास आहे चाळीस टक्के कमिशनवर तो जाहिरातीचे बिल वसूल करून सर्व रक्कम स्वत जवळच ठेवतो बँकेतील ती एक सुरक्षित ठेव आहे असे मी समजतो वर्तमानपत्र बद पडेपर्यंत ही ठेव बँकेतच पडून असते पुढें बँक आणि ठेवीदार एकमेकाना विसरतात व शेवट गोड होतो

सन्मान्य जाहिरातदाराचे आभार मानल्यानतर मी आता माझ्या वर्गणीदाराचे आभार मानतो ईश्वर कृपेने मला फार थोडे वर्गणीदार आहेत. त्यामुळें जास्त वर्गणी बुडण्याची भीति नाही माझ्या 'बेडापार' मासिकाचे एकदर सात वर्गणीदार असून, त्यापैकी दोन माझे मेहुणे आहेत एक माझा सासरा आहे एक माझा सावकार आहे. ह्या लोकाकडून वर्गणी काय मागणार ! फक्त तीनच परके वर्गणीदार आहेत त्याना टिकवून ठेवण्यात मी बराच यशस्वी झालो आहे अक मिळत नाही ही त्याची नेहमीच तक्रार असल्यामुळें, दोन दोन, तीन तीन अक त्याना परत परत पाठवावे लागतात. वर्गणीदारानी पाठविलेले लेख आणि कविता मुकाट्याने छापावे लागतात. नाहींतर वर्गणी बद होण्याची धास्ती असते वर्गणीदाराच्या घरी लग्नकार्य असल्यास, किंवा त्याला मुलगा झाला असल्यास, ती बातमी फोटोसकट प्रसिद्ध केली नाही तर वर्गणीदार टिकेल कसा ? माझे अवघे तीन वर्गणीदार ! पण त्याना साभाळण्यासाठी मला किती दक्षता घ्यावी लागते तें मलाच माहित ! सभ्य स्त्रीपुरुषहो, माझें व्याख्यान बरच लाबले म्हणून तुम्ही कटाळला असाल ! पण माफ करा ! आजचे कार्यच तसे आहे माझ्या दिवाळी अकाचा हा उद्घाटन समारभ आहे अशा आनदाच्या प्रसगी माझ्या सर्व सहकाऱ्याचे गुण गाणे हें माझें पवित्र कर्तव्यच आहे

आता मी फार वेळ घेत नाही ज्या छापखान्यात हा बहुमोल अक छापून निघाला, त्याच्या कर्तबगार मालकाचे आणि छापखान्यातील सर्व कामगाराचे मी किती आणि कसे आभार मानू ? ह्या अकातील एकहि लेख तुम्हीं नीट वाचू शकत नाहीं, यातच छापखान्याचा लौकिक आहे आधींच आमच्या कर्मानें डागळलेला हा अक छापखान्याच्या शाईनें जास्तच डागळला

आहे. भिकार छपाई आणि भयंकर मुद्रणदोष यांमुळें नवकाव्यांतील गूढता अधिकच गूढ झाली आहे. आणि चांगल्या चांगल्या लेखाची आणि चित्रांची अगदी वाट लागली आहे. याबद्दल मी मालकाना मुळींच दोष देत नाहीं. ते अतिशय कर्तव्यदक्ष आणि गिऱ्हाइकाचें काम चोख करून देणारे गृहस्थ आहेत. त्यांच्या छापखान्यात लग्नपत्रिका आणि सर्कशीची हॅंडबिलें फार चागली छापलीं जातात. पण मासिकाचा आणि दिवाळी-अकाचा ते मुडदा पाडतात. आधुनिक मराठी साहित्यावर त्याचा फार राग आहे हें साहित्य समाजाला अध पातास नेणारें आहे अशी त्याची तक्रार असल्यामुळें आपल्या छापखान्यांत ते मराठी साहित्याचा सूड घेत असतात.

अंक उशीरा निघाला म्हणूनहि मी छापखान्याला दोष देत नाही. छापखान्यात भुताटकी फार आहे. मशीन बद पडणे, फॉर्म कोसळणे, कंपोज् विसकटणें, कागद हरवणें, कामगाराना ऐनवेळी इन्फ्लुएझा होणें वगैरे भुताटकीचे प्रकार वारवार घडत असल्यामुळें अक बाहेर पडण्यास विलंब झाला. तरीपण अक अजिबात न निघण्यापेक्षा तो केव्हातरी निघाला हेच तुमचें नशीब समजा !

आता तुम्हां सर्व प्रेमळ वाचकाचे आभार मानून मी आपली रजा घेतों. वाचकांच्या चांगुलपणावर किंवा गाफीलपणावर विश्वास ठेवूनच मी हा दिवाळी-अंक काढण्याचें धाडस केलें आहे. तुम्हाला खूप करण्यासाठी 'वाचकांचें टपाल' हें सदर मी मासिकात सुरू केले आहे तुमच्या सर्व तक्रारी वेशीवर टागण्यास मी आणि माझें मासिक तयार आहे पण कृपा करून माझ्या या दिवाळी-अकाविरुद्ध तक्रार करू नका. हा अक गोड करून घ्या. हा अक तुम्हीं विकत घेतलाच पाहिजे असा माझा आग्रह नाही. जे फुकटे वाचक आहेत, त्यांनीं कृपा करून हाहि अक फुकट वाचावा. जे विकत घेऊन वाचणारे आहेत, त्यांनींहि जरा विचार करूनच खिशात हात घालावा. वाचकहो, सपादकाला जिवंत ठेवण्याच्या भावनेनें उगीच बेचैन होऊ नका.

आतापर्यंत वृत्तपत्र क्षेत्रांतील आठ आधारस्तभांचा मी गौरव केला. लेखक, चित्रकार, एजंट, कागदवाला, छापखानेवाला, जाहिरातवाला, वर्गणीदार, आणि वाचक या सर्वांचे मी आभार मानले. आता उरलेला नववा ग्रह

## राजकारणी पोपट : २०

उदीरगावचे थोर पुढारी दे भ चूडामणी यांची एक खास मुलाखत घेऊन ती वर्तमानपत्रात प्रसिद्ध करावी, म्हणून मी मुद्दाम उदीरगावला गेलों पण चूडामणींचे घर शोधून काढताना मला बरेच रखडावे लागले कारण चूडामणींनी आपले बिऱ्हाड गावापासून दहा मैल लाब हलविले होतें गेल्या काही वर्षांत भारतीय राजकारणात चुडामणीचे नाव फारच गाजू लागल्याकारणाने त्यांच्या दर्शनासाठीं कार्यकर्त्यांची, सरकारी अधिकाऱ्यांची आणि वार्ताहरांची खूपच गर्दी उडणे स्वाभाविक होते हा उपद्रव कमी व्हावा या हेतूनें श्री चूडामणी यांनी शहरातला आपला मुक्काम हलवून मुद्दाम गावाबाहेर डोंगरमाथ्यावर टुमदार बगला बाधून तेथें नेला होता त्या बगल्याला दिलेले 'स्वर्गसोपान' हें नाव किती अर्थपूर्ण आहे याचा अनुभव तो डोंगर चढून जाणाऱ्याशिवाय इतराना येणे शक्य नाही देशाच्या फाळणीनतर उदीरगावात जातीय दगा झाला तेव्हा दे भ चूडामणी हे याच डोंगरमाथ्यावरून खालच्या जनतेला शांततेचा उपदेश करीत होते, असे म्हणतात

अशा या थोर पुढाऱ्याची मुलाखत मिळविणे हें सोपें काम नाहीं याची मला कल्पना होतीच अगोदर एवढा मोठा डोंगर चढून जिवत राहणें हीच मुळी भाग्याची गोष्ट ! त्यानतरहि सहजासहजीं चूडामणींचे दर्शन घडेल याची खात्री नाहीं ! त्यांचा कार्याचा व्याप, त्यांचा बहुमूल्य वेळ, त्यांच्या भोंवतालची गर्दी इत्यादि भयाण चित्रें माझ्या डोळ्यांसमोर नाचू लागलीं ! श्री चूडामणी यांची मुलाखत मिळवायची म्हणजे अडचणींचा

केवढा मोठा डोंगर ओलांडावा लागतो याची मला कल्पना आ ईश्वराचे नाव घेत मी गिर्यारोहण केले आणि बिचकत बिचकत 'स्वर्गसोपान' च्या पायरीवर पाय ठेवला.

पाय ठेवल्याबरोबर केळीच्या एका सालीवर घसरून मी त्या इमारतीच्या दारातच आपटी खाल्ली दे भ. चूडामणी हे फक्त केळघाच्या आहारावरच असतात याची मला आठवण झाली. आणि अनायासे त्या थोर देशभक्ताच्या पवित्र घराला साष्टांग नमस्कार घडला, याबद्दल समाधानहि वाटले.

अंगावरची धूळ झाडीत मी उठलों आणि दारातून डोकावून पाहिले सर्वत्र सामसूम आणि शुकशुकाट होता एवढ्या मोठ्या बंगल्यात नोकर-चाकर, गडी, माळी, वगैरे कुणीच नसलेले पाहून दे भ चूडामणी याच्या साधेपणाची कल्पना आली. स्वावलंबन आणि साधेपणा या दोन गुणांबद्दल चूडामणींचा फारच लौकिक होता म्हणून त्यांच्या बंगल्यात नोकरचाकर दिसले नाहीत याचे मला नवल वाटले नाही

पण माझ्या अपेक्षेप्रमाणें कार्यकर्त्यांची गर्दीहि त्या ठिकाणी असू नये याचे मला नवल वाटलें मार्गदर्शनासाठीं, सल्लामसलतीसाठी, स्फूर्ति घेण्या-साठीं मोठमोठें पुढारी आणि प्रांतोप्रांतीचे समाजसेवक चूडामणीच्या दारात तास तास तिष्ठत असतात, असे मी वर्तमानपत्रात वाचले होतें. अशा प्रका-रच्या बातम्या उदीरगावचा वार्ताहर मुंबईच्या वृत्तपत्राकडे नेहमी पाठवीत असे. पण मला मात्र उदीरगावचा एक उदीरसुद्धा चूडामणीच्या दारात आढळला नाही.

एखाद्या निर्जन बेटात तर मी आलों नाहीं ना, अशी मला शका आली. गांगरलेल्या मुद्रेने इकडे तिकडे पहात मी चुळबूळ करू लागलो बराच वेळ झाला तरी कुणाचीहि चाहूल नव्हती. एवढ्या मोठ्या प्रसिद्ध पुढाऱ्याच्या महान् निवासस्थानात एवढा भयाण शुकशुकाट असावा म्हणजे काय ? निदान एखादें लहान ोर तरी ! छे ! दे. भ. चूडामणी हे नैष्ठिक ब्रह्मचारी म्हणून ख्यातनाम असल्यामुळें, त्यांच्या घरात बायकामुलांची अपेक्षा करणे व्यर्थ होतें.

बराच वेळ वाट पाहून झाल्यावर "घरात कोण आहे का ?" अशी एक आरोळी मी ठोकून दिली ! पण ती आरोळी हवेतच उडत गेली ! वाऱ्याशीं बोलण्यात काय अर्थ आहे म्हणून मी गप्प राहिलो

दरवाजा उघडाच होता सरळ आत घुसावे आणि सशोधन करावे असा मी विचार केला चूडामणी जरी भेटले नाहींत तरी त्यांची स्मृति म्हणून एखादी वस्तु उचलून न्यावी असेहि मी ठरविले, पण इतक्यात आतून एक व्यक्ति डुलत डुलत येत असलेली दिसली तिरळ्या डोळ्याची, काळ्या वर्णाची आणि पाढऱ्या पातळाची अशी ती तरुणी होती त्या शुभ्र वसनधारी श्यामलेकडे पाहून मी अत्यत आदराने नमस्कार केला.

चूडामणीसारख्या त्यागी आणि ब्रह्मचारी पुरुषाच्या घरात ही स्त्री कोठून आली याचा विचार करीत असताच, तीन वर्षांपूर्वी वर्तमानपत्रात वाचलेली एक स्फूर्तिदायक घटना मला आठवू लागली !

त्यावेळीं उदीरगावात जातीय दगा झाला होता काही गुडाच्या हातानीं बायका पळविण्याचेहि प्रकार झाले तेव्हा दे भ चूडामणी यानीं गुडाना उद्देशून एक पत्रक काढले, त्या पत्रकात गुडाना नीतीचा उपदेश केला होता, परस्त्रीचे अपहरण करणे पाप आहे असे गुडाना कळकळीने सागितले होतें दे भ चूडामणी याच्या त्या पत्रकाचा परिणाम एका गुडाच्या मनावर असा काही झाला की, त्याच्या हृदयपालट होऊन रातोरात त्यानें आपण पळवून नेलेली बाई ह्या डोगरावर आणून ठेवली तेव्हापासून ही भाग्यशाली स्त्री या डोगरावरच 'स्वर्गसोपान' मध्यें देशसेवा करीत राहिली आहे

दोन्ही हात जोडून अत्यत नम्रपणें मी म्हटले,

"देवी, गेले तीन दिवस मी उदीरगावात रखडतो आहे दे भ. चूडामणी याच्या दर्शनाची मला तहान लागली आहे त्याच्या मुलाखतीचे भाग्य मला लाभेल काय ?"

दाराजवळची माती चादीच्या भाड्यात भरून घेत ती म्हणाली,

"चूडामणीची आघोळ चालली आहे तुम्ही थोडा वेळ या स्वदेशी-मडच्या मुलाखत–खोलीत बसा ते तुम्हाला दर्शन देतीलच"

तिने दिलेले आश्वासन ऐकून मी हर्षभरानें वेडाच झालो एवढीत माझी तपश्चर्या फुकट जाणार नाही तर !

पण ती बाई चादीच्या भांड्यांत रस्त्यावरची माती का भरून घेते याचे मला कोडें पडलें. मी कुतूहलानें विचारले,

"देवी, पामराची शंका आपण निरसन कराल का ? या सुदर रौप्य-कलशात रस्त्यावरची मृत्तिका भरण्याचे कारण काय ?"

आपल्या दैवी मुखमडलावर निर्मल हास्य आणून ती म्हणाली,

"चूडामणीच्या आघोळीसाठी ही माती आहे. ते साबण कधीच वापरत नाहींत. माती लावून आघोळ करीत असतात."

ही आणखी नवीन बातमी ऐकून चूडामणीविषयीचा माझा आदर दुणावला. ते आधुनिक ऋषीच आहेत याची मला खात्री झाली.

त्या बाईनें दाखविलेल्या मुलाखत खोलींत मी प्रवेश केला ! आपल्या भेटीस येणाऱ्या थोर थोर कार्यकर्त्यांना आणि जगातील वार्ताहराना चूडामणी याच खोलीत मुलाखत देत असतात.

त्या खोलीचा थाट काय वर्णावा ! पाच सहा मोडक्या खुर्च्या, तीन चार तेलकट वळकट्या व मळकट फाटक्या उशा अस्ताव्यस्त पसरल्या होत्या. खोलीच्या भिंतीना ठिकठिकाणी भगदाडें पडली होतीं आणि त्यावरच योगासने, शीर्षासनें याची चित्रें टागलीं होती. एका कोपऱ्यात टेबलावर एक जुनाट घड्याळ होतें. आणि दुसऱ्या कोपऱ्यात एक खड्डा खणून कडुनिंबाचे झाड नुक्तेंच लावलेले दिसत होतें

खोलीतल्या सजावटीने कावराबावरा होऊन मी एका खुर्चीवर हळूच टेकण्याचा प्रयत्न केला पण ती खुर्ची तीन पायानी लगडी असल्यामुळें, मी खाली कोलमडू पडलों. मी खुर्चीवर बसण्याऐवजीं, खुर्चीच माझ्यावर बसली. मी पुन्हा उठून उभा राहिलो. पण तसे करताना माझ्या डोक्यावर दाणकन् कांहीतरी आपटलें डोके चोळीत मी वर पाहातों तर काय ! तो पोपटाचा पिंजरा होता. एक सुदर देखणा पोपट पिंजऱ्यातल्या दांडीवर डौलानें बसला होता.

'नमस्ते ! रामराम ! जयहिंद ! या बसा !' तो पोपट बोलूं लागला. मला धक्का बसला नजर विस्फारित करून मी विस्मयातिरेकानें त्या प्राण्याकडे पाहत राहिलों ! काय चमत्कार तरी ! अगदी हुबेहूब माणसा-सारखे बोल या पोपटाच्या मुखांतून निघावेत हे केवढें आश्चर्य !

मी त्या पोपटाला नमस्कार केला आणि त्याच्या विनतीला मान देऊन जमिनीवर बसलों.

'उत्पादन वाढवा ! अधिक धान्य पिकवा !' त्या पोपटाच्या वाणींतून पुन्हां शब्द निघाले !

मी थक्क होऊन गेलो. एखाद्या पुढाऱ्याप्रमाणें हा पोपट उपदेश करतो म्हणजे काय !

'विधायक कार्य करा ! गांधीजीच्या मार्गानें जा !' त्या पोपटाने पुन्हा मधुर बोल काढले !

मी त्या पोपटावर खूष झालों. जमिनीवर पडलेला एक पेरूचा तुकडा उचलून त्याच्या लाल चोचीजवळ मी धरला.

पेरू मिळताच तो पोपट दांडीवर नृत्य करूं लागला. त्याची लाल चोच, हिरवे पंख, नाजूक पाय, पाहण्यात मी तल्लीन झालों. पेरूचा चट्टामट्टा करीत तो पोपट बोलू लागला.

'अन्नाची काटकसर करा ! उपास करा ! शाकभाजी खा !' हा पोपट नसून पोपटाच्या रूपातला देशभक्तच तर नाही ना, अशी शंका आली. या पोपटाला इतके शिकविले कुणी ? पुढाऱ्याच्या ठराविक घोषणा यानें तोंडपाठ केल्या कधी ?

मान वाकडी करून तो पोपट माझ्याकडे पाहू लागला. त्याला आणखीं खायला हवें असे समजून मी एक हिरवी मिरची पिंजऱ्यात सारली. पोपट खूष होऊन बोलू लागला,

'भारताला स्वयपूर्ण बनवा ! आपली उज्वल परंपरा राखा ! शिस्त वाढवा !'

पोपटाच्या घोषणा वाढतच चालल्या, पण सुरवातीला कौतुक वाटलें तरी पुढेंपुढें त्याचा मला कंटाळाच आला. कारण तो नवीन काहीं सांगत नव्हता. जें आम्ही रोज रोज ऐकतों तेंच तो बोलत होता !

दे. भ. चूडामणी अजून कसे येत नाहींत म्हणून मी अस्वस्थ झालो. या गृहस्थाची आंघोळ आटपणार तरी कधीं ?

'आणखी थोडी कळ सोसा !' पिंजऱ्यातून संदेश आला ! वा ! माझें मनोगत ओळखून पोपटाने मला चोख उत्तर दिलें तर !

'ध्येयाची आठवण ठेवा.' तो बोलका पक्षी पुन्हां बडबडू लागला."

'आपली जबाबदारी ओळखा ! जातीयता व प्रांतीयता यांना थारा देऊं नका ! सरकारचे हात बळकट करा !' पोपटपंची चालूच होती.

मी माझे दोन्ही कान घट्ट दाबून धरले !

इतक्यात स्नान करून शुचिर्भूत झालेले दे. भ. चूडामणी डोळे चोळीत आले. मातीने आघोळ केल्यामुळें त्याच्या डोळ्यात धूलिकण शिरले असावेत.

साष्टांग नमस्कार घालून मी म्हटलें,

" महाराज, केव्हापासून मी आपली मार्गप्रतीक्षा करीत आहे ! आपली मुलाखत मिळविण्यासाठी मी धडपडतों आहे. महाराज, काहीतरी बोला ! संदेश द्या !"

दे. भ. चूडामणी म्हणाले,

"बेटा, सकाळपासून या पोपटाने तुम्हाला सर्व काही सांगितलेच असेल ! मी आणखी नवीन काय सांगणार ! आता मुलाखतीची जरुरीच नाहीं बेटा ! माझे काम या पोपटानें अगोदरच करून ठेवलें आहे !"

□□□

धडा १

## आई

ही माझी आई. ही बाळाची आई ही बेबीची आई ही आमची आई. आमची आई छान आहे. ती सकाळीं दहा वाजता उठते बाबानीं करुन ठेवलेला आयता चहा पिते.

आई दिवाळीसाठी गोड गोड पदार्थ करते करजी करते चकली करते. पण आईची चकली बाबाना आवडत नाही. आईची चकली खाऊन बाबाचे तीन दात पडले.

आई गोड गोड गाणी म्हणते. सिनेमातलीं गाणी म्हणते आईचे गाणे *आम्हाला आवडते. पण बाबा बाहेर पळ काढतात.*

आई लेखिका आहे आईच्या कविता मासिकात छापून येतात. पण त्या सगळ्या कविता बाबाच लिहून देतात.

आमची आई गोरी आहे, पण कधी कधी काळी दिसते. कारण घरात पावडर संपलेली असते. मग बाबा बाजारातून पावडर आणतात. आई पुन्हां गोरी दिसू लागते.

आई कधी आजारी पडत नाही. कारण ती रोज आईसफ्रूट खाते पण बाबाना आईसफ्रूट पचत नाही ते तावडतोब आजारी पडतात.

आई फार काटकसरी आहे. ती बाबांना सिगारेट ओढू देत नाही. सिनेमा पाहू देत नाही स्वत. एकटीच सिनेमा पाहून, बाबाना त्याचे कथानक सांगते.

आई आमची शहाणी आहे ती बाबाच्या खिशातले पैसे चोरते ही गोष्ट आम्हीं बाबाना सागू नये म्हणून आम्हाला खाऊ देते

## धडा २

## बाबा

हे माझे बाबा हे बाळूचे बाबा हे बबीचे बाबा हे आमचे बाबा आमचे बाबा चागले आहेत ते सकाळीं पाच वाजता उठतात चूल पेटवून चहा करतात मग स्वयपाक करतात

बाबा दिवाळीला आम्हाला फटाके घेऊन देतात पण आमचे सव फटाके आईच वाजवून टाकते

बाबा आईला फार घाबरतात, बाबा अपला सव पगार आईला देतात आई बाबाना ट्रामसाठी रोज एक आणा देत दर रविवारी हजामतीसाठी तीन आणे देते

बाबा नेहमी फाटके कपडे वापरतात पण आईला उची साडी घेऊन देतात आपण पावसात भिजतात , पण आईला छत्री घऊन देतात

बाबा फार शहाणे आहेत ते चोरून विडया ओढतात चोरून सिनेमा पाहतात. कारण आईची त्याना भीति वाटते बाबा मधून मधून उपास करतात पण गुपचूप चिवडा खातात ही गोष्ट आम्ही आईला सागू नये म्हणून ते आम्हालाहि थोडा चिवडा देतात

बाबा रोज रात्री उशीरा घरी येतात आई त्याना दार उघडीत नाही. मग बाबा खिडकीतून उडी मारून आत येतात आणि रामनामाचा जप करीत झोपी जातात

बाबा रोज देवपूजा करतात. आईला माहेरी जाण्यास विनति करतात, पण आई जात नाही बाबा हताश होतात

बाबाना गाणे ऐकण्याचा फार नाद आहे पण आईचे गाण त ऐकत नाहींत शेजारी जाऊन दुसऱ्या बाईचे गाणे ऐकतात मग आई बाबाची चागली हजेरी घेते बाबा आम्हा मुलाच्या मागें दडतात आम्ही बाबाचे रक्षण करतो.

## धडा ३

## ताई

ही माझी ताई. ही बाळाची ताई. ही बेबीची ताई ही आमची ताई. आमची ताई शहाणी आहे ती शाळेंत जाते. फार अभ्यास करते, पण परीक्षेंत नापास होते

ताई लग्नाला वाढली आहे बाबा तिच्या लग्नाची खटपट करतात. ताईला पाहायला खूप माणसे येतात, पण तिला कोणीच पसत करीत नाहीत. बाबा हुंडा द्यावयाला तयार आहेत. पण हुंडा नको आणि ताईहि नको, म्हणून लोक दूर दूर पळतात.

ताई आमची गुणाची आहे. ती चित्रकलेत हुषार आहे. छान छान चित्रें काढते. पण चित्र माणसाचे आहे, की गाढवाचे आहे ते ओळखायला येत नाही.

ताई नृत्यकलेत पण हुषार आहे. शाळेच्या स्नेहसंमेलनात एकदा ताईचा नाच झाला, तेव्हा शाळेची इमारत भूकप झाल्याप्रमाणे हालू लागली. पहिला मजला कोसळून पडला. तेव्हापासून ताईचा नाच कायद्याने बद करण्यात आला आहे.

ताई रोज वेणीफणी करते मानेवर शेपटा सोडते. कधीं कधी चक्री अबाडा घालते सैल अबाडाहि घालते ताईचा अबाडा पाहून शेजारचा वसत गाणे गुणगुणतो, ' राधे, तुझा सैल अबाडा ! '

ताई रोज पत्रें लिहिते. गुलाबी कागदावर छान छान पत्रे लिहिते ती एवढी पत्रें कुणाला लिहिते तें मला माहीत आहे. ताई मला पेपरमिंट देते आणि मी ताईची पत्रें शेजारच्या वसताला गुपचूप नेऊन देतो.

## धडा ४

## मामा

हे आमचे मामा. साऱ्या गावाचे मामा मामाना ' गावमामा ' असेहि म्हणतात. काही ' कामापुरता मामा ' असेहि म्हणतात.

मामा मोठे खिलाडू आहेत. विनोदी आहेत. बडबडे आहेत. त्यांचे तोंड कधीच बद नसतें. जसा काहीं रेडिओच.

मामा गोड गोड गोष्टी सांगतात आपला अनुभव सांगतात . रानात एकदा आपण नुसत्या काठीने वाघ कसा मारला ते सांगतात मामा इंग्लंडला गेले असता, चर्चिलने आपला चिरूट टाकून मामाकडे विडी मागून तिचा कसा झुरका घेतला याचे रसभरीत वर्णन मामा अनेकदा करतात.

मामाना चहा फार आवडतो, पण स्वत पैसे खर्च करून ते कधीच चहा पीत नसतात शेजारी पाजारी जाऊन चहा पितात मित्राबरोबर मामा हॉटेलात जातात, पण मामाचे बिल मित्रच भरतात

मामा चांगले नट आहेत नाटकात ते काम करतात. कधीं राक्षसाचा पार्ट घेतात कधी भुताचा पार्ट वठवितात मामाचे नाटक असले म्हणजे थिएटर रिकामेंच असतें फुक्ट पासवालेच गर्दी करतात. त्यामुळें नाटक कंपनीच्या मालकाना तोटा होतो. पण तो तोटा ते आनंदाने सहन करतात.

मामा वळ लावण्यात पटाईत आहेत असे म्हणतात इकडचे तिकडे आणि तिकडचे इकडे करतात लोकामध्यें भांडणे लावून देतात, आणि आपण मजा पाहतात. मामाच्या या गुणामुळें ते अतिशय लोकप्रिय झाले आहेत

मामा स्वत ला पुढारी समजतात सभेंत भाषण करतात मामाच्या सभेला पोलिसाचा कडक बंदोबस्त असतो कारण पोलीस असल्याशिवाय मामाची सभा सुरक्षित पार पडत नाही.

□□□

## शब्दकोड्याचा बक्षिस समारंभ : २२

स्थळ – 'बडल' वर्तमानपत्राची कचेरी 'बडल' वर्तमानपत्राच्या शब्दकोड्याचे बिनचूक उत्तर पाठवून सात हजार रुपयाचे पहिले बक्षीस पटकावल्याबद्दल विजयी उमेदवार श्री मारुती मालीशवाला याचे अभिनंदन करून त्याना समारंभपूर्वक बक्षिस देण्यासाठी एक सभा भरली आहे एक चूक करून दुसरे बक्षिस मिळवणारी सौ बेसनबाई मोतीचूर यानाहि सन्मानपूर्वक व्यासपीठावर बसविण्यात आले आहे

समारंभाला 'बडल'चे संपादक श्री दाडगेश्वर, मालक शेठ मखन लाल मलईवाला, मॅनेजर श्री नानीभाई नानखटाई, एजंट बबनराव इत्यादि बरीच मंडळी उपस्थित आहेत

प्रथम कोकिळा संगीत विद्यालयातील दोन मुली स्वागत गीत गातात

### ( स्वागत गीत )

हा कोडेवाला आला
ओवाळू आरती त्याला ॥
शब्दाचे कोडे गहन
आडवे उभे चौकोन
गुदमरला याचा प्राण
परि अखेर विजयी झाला ।
ओवाळू आरती त्याला ॥
बक्षीस लाटुनी पहिले
बाघोल मवे हा इमले

लग्नहि अचानक जमले
भाग्योदय पुरता झाला ।
ओवाळू आरती त्याला ॥
हा गरीब मालिशवाला
संदेश देई जगताला
'वडल' चे कोडें उकला
दारिद्रय जाई विलयाला ।
ओवाळू आरती त्याला ॥

( 'वडल'चे संपादक श्री दांडगेश्वर टाळ्यांच्या गजरात भाषण करतात )

श्री. दांडगेश्वर— बंधूंनो आणि भगिनींनो, आज आपण विजयी वीराचें अभिनंदन करण्यासाठी जमलो आहोत 'वडल' चे शब्दकोडें बिनचूक सोडवून पहिलें बक्षीस लाटणारे श्रीयुत मारुती मालीशवाला यांना बक्षिसाची रक्कम जाहीरपणें देण्याचा हा समारंभ आहे. मारुती मालीशवाला हा मुंबईचा एक गरीब तरूण आहे ! लोकांच्या डोक्याला तेल रगडणें हाच त्याचा धंदा ! पण आज त्याला अचनक सात हजार रुपये मिळतात हा केवढा चमत्कार ! आज आपल्या देशात दारिद्रय आणि उपासमार खूप आहे. हें दारिद्रय दूर करण्यासाठी विविध पक्षांची धडपड चालू आहे ! पण या मंडळींच्या हातून काय पराक्रम होणार ? गरिबांची दुःखें कोणीहि निवारण करू शकत नाहीत ! आज आर्थिक दुस्थितीवर एकच प्रभावी तोडगा आहे आणि तो म्हणजे 'वडल'चे कोडें होय ! दारिद्रयनाशाचा हाच एक महामंत्र आहे अवघ्या आठ आण्याची प्रवेशपत्रिका भरून बिनचूक किंवा एक चूक उत्तर पाठविलें तरीसुद्धा तुमचा आर्थिक प्रश्न चुटकीसरशी सुटण्यासारखा आहे. कोड्याच्या चढाओढींत जे अयशस्वी होतात, त्यांचाहि अप्रत्यक्षपणे फायदाच होत असतो. त्यांच्या ज्ञानात भर पडते. शब्दकोशातील अगणित शब्दांचे ज्ञान होऊन त्यांची शब्दसंपत्ति वाढते. म्हणजे कोडें सुटलें तरीहि फायदा, न सुटले तरीहि फायदाच ! आम्हा संपादकाचे अग्रलेख वाचताना आकलन होण्यास या शब्दसंपत्तीचा फार उपयोग होईल. असो, आजचे यशस्वी उमेदवार मारुती मालीशवाला आणि

एक चूकवाली सौभाग्यवती बेसनबाई मोतीचूर याचे अभिनदन करून मी आपली रजा घेतो

(मॅनेजर नानाभाई नानखटाई हातात चेक आणि पुष्पहार घेऊन उभे रहात )

श्री. नानखटाई.- मारुतीराव मालीशवाले, बेहेन बेसनबाई आणि सभ्य स्त्रीपुरुषहो, आज हा सात हजाराचा बहुमोल चेक मारुतीरावाना अर्पण करताना मला अत्यत आनद होत आहे एखाद्या श्रीमताला ही रक्कम द्यावी लागली असती तर मला इतका आनद झाला नसता आणि त्याचा एवढा गाजावाजा करणेहि योग्य झाले नसते पण कोडें सोडविण्याची अक्कल बहुतेक गरिबानाच असते ही समाधानाची गोष्ट होय देशातील अज्ञान आणि दारिद्र्य नष्ट करण्यासाठी म्हणून पाच वर्षांपूर्वी आम्ही 'वडल' वर्तमानपत्र सुरु केले या पाच वर्षांत जनतेचे अज्ञान नष्ट झाले, पण दारिद्र्य तसेच राहिले ! म्हणून आम्हीं कोड्याची ही योजना सुरु केली आहे 'वडल'चे मालक शेठ मखनलाल मलईवाला हे भाडवलवाले नसून सपत्तीची वाटणी करणारे समाजवादी आहेत, हें तुम्हाला या कोड्याच्या योजनेवरून कळून येईल दर महिन्याला देशातील दोन कामगार तरी आम्हीं श्रीमत करून सोडणार आहोत आमच्या वर्तमानपत्रात कोडी सुरु झाल्यापासून त्याचा खप बेसुमार वाढला सहा वर्षांच्या मुलापासून साठ वर्षांच्या म्हाताऱ्यापर्यंत सगळेचजण आमच्या शब्दरचना स्पर्धेत भाग घेतात बुद्धिचातुर्य दाखवून पैसे कमविण्याची ही सोनेरी सधि आहे हें कोडें सोडविणे म्हणजे जीवनाचे कोडें सोडविण्यासारखें होय ! प्रवेश पत्रिका भरून पाठविणे म्हणजे लग्नपत्रिका तयार करून ठेवण्यासारखेंच आहे आडव्या उभ्या चौकटींतल घर म्हणजे तुम्ही नवीन बाधणार तें घर होय शब्दाची जुळवाजुळव करणे म्हणजे आपल्या भावी घरासाठी लागणाऱ्या भाड्याची जुळवाजुळव करणे होय ! असो आज या प्रसगी पहिल्या बक्षिसास पात्र झालेले श्री मारुतीराव याना मी टाळ्याच्या गजरात पुष्पहार घालून चेक अर्पण करतों त्याचप्रमाणें एक चूक करून दुसरें बक्षिस [illegible] बेहेन बेसनबाई याच्या हातावर मी पाचशें रुपयाची रे[illegible] [illegible]देतों आणि आयुष्यात एक चूक केल्याबद्दल बेसनबाईंचे अभि[illegible]

(टाळयाच्या गजरात पुष्पाहार आणि बक्षिसाचे कार्यक्रम झाल्यावर 'बडल'चे एजट श्री बबनरान बोलावयास उठतात )

श्री. बबनराव - बडलचे मालक, मॅनेजर, सपादक आणि इतर सभ्यजनहो, आजचा विजयी वीर मारुती मालीशवाला याचा मी थोडा परिचय करून देणार आहे त्याला मी लहानपणापासून ओळखतो आमच्या गावचा एक उडाणटप्पू, कारटा म्हणून त्याची ख्याती होती शाळेला नेहमी तो दाडी मारायचा एक दिवस मुबईत पळून येऊन तो मालीशवाला झाला त्याचा धदा डोक्याचा! डोक्याला तेल लावण्याचा! गिऱ्हाइकाच्या डोक्यावर सफाईने हात फिरविण्याची कला त्याला अवगत आहे! त्याचप्रमाणे नेहमी तेलाशी सबध येत असल्यामुळें तैलबुद्धीचाहि म्हणून त्याची शिफारस करण्यास हरकत नाही! अशा डोक्याच्या आणि तैलबुद्धीच्या माणसाने वर्तमानपत्रातले कठीण शब्दकोडें सोडवून सात हजाराचें पहिले बक्षिस मिळविलें यात नवल तें काय! मित्रहो, मारुती मालीशवाला याची स्वाभाविक प्रवृत्तिच मुळी कोडें सोडविण्याकडे आहे! जगात कुठेंहि गुतागुंत, पेंचप्रसग दिसून आला कीं आमचा मारुती ती कठीण समस्या उलगडण्यात पटाईत! एकदा त्याच्या सायकलीला एका तरुणीचा पदर अडकला! मारुतीने अशा काही कौशल्यान ती गुतागुत दूर केली, की ती बाई त्याच्यावर फिदाच झाली! एकदा एका चोराचे धोतर काटेरी कुपणात अडकले जवळ मारुतीराव होता म्हणून त्याची सुटका झाली! नाहीतर तो चोर पोलिसाच्या तावडींतच सापडायचा! काही स्त्रियाच्या वेणीत अडकून पडलेल्या पिना त्याने हळुवार हाताने बाहेर काढल्या आहेत झाडामुडपात शिग अडकवून पडलेल्या गाई-म्हशीच्या मदतीला तो अनेकदा धावून गेला आहे. एकदा दूधकेंद्रावर एका दुधाच्या भाडयात कुत्र्याचे मुडके अडकून मोठी खळबळ उडाली! मारुतीरावाच्या करामतीमुळें कुत्र्याचे मुडके सकटमुक्त झालेच, पण दुधाचा एक थेंबहि खाली साडला नाही! डोक्याला तेल चोळण्याचा त्याचा धदा असल्यामुळें शेंडीचा गुतवळा उलगडणे तर त्याच्या हातचा मळ आहे! जीवनात जिथें जिथें कोडें दिसले, तिथें तिथें मारुतीरावाचे डोके यशस्वीपणें चाललेच म्हणून समजा! एकदा एका लेखकाची कादबरी अर्ध्यावर अडकून पडली. निरगाठीचा उकल कसा करावा हें

त्याला समजेना ! शेवटीं मारुतीरावाच्याच सल्ल्याने खलनायकाला मोटार अपघात झाला, आणि नायक नायिकेचे लग्न होऊन कादंबरी संपूर्ण झाली ! मित्रहो, अशा प्रकारे नाना प्रकारचीं कोडी सोडविणाऱ्या या तैलबुद्धीच्या माणसाने वर्तमानपत्रातले एक लहानसे शब्दकोडें सोडवावे यात नवल तें काय ! असो, आता मी एक चूकवाली सौभाग्यवती बेसनबाई मोतीचूर याचा आज परिचय करून देतो बेसनबाईने एक चूक करून दुसरे बक्षीस मिळविले आहे या बाईने आयुष्यात इतक्या कांहीं चूका केल्या आहेत कीं तिने या कोडयामध्यें एक चूक का करावी याचे मला नवल वाटतें ही बाई आमच्याच चाळीत राहणारी असून तिची शब्दसंपत्ति दांडगी आहे कोडें सोडवू इच्छिणाऱ्या इतर उमेदवाराना शब्दकोशाची मदत लागते, पण बेसनबाईंना शब्दकोशाची मुळीच जरुरी भासत नाही तिच्याजवळ शब्दाचे केवढें अफाट भांडार आहे हें नळावरच्या भांडणात नेहमी दिसून येतें तिचे तोंड रात्र-दिवस चालत असते घरात नवरा नसला तरी त्याच्या फोटोला ती धमकी देत असते नवरा रात्री उशीरा घरी येतो याचे कोडेंहि तिने नुकतेच उलगडले आहे ! दिवाळीच्या वेळी या बाईने घातलेल्या रांगोळ्या तुम्ही पाहिल्या आहेत काय ? अगदी हुबेहूब कोडयाची चौरस ! दोन चार आडवे उभें फटकारे मारले की झाल्या तिच्या रांगोळ्या ! असो मारुतीराव मालीशवाला आणि बेसनबाई मोतीचूर याना लाभलेल्या यशाबद्दल मी त्यांचें अभिनंदन करतो आणि या कोडयामुळें 'बंडल' चा सेल बेसुमार होत आहे याबद्दल एजंट या नात्याने मी स्वत:चे अभिनंदन करून घेतो आता ग्रुप फोटो आणि चहापान होऊन हा सगळा वृत्तांत उद्याच्या अंकात छापण्याबद्दल संपादकाला सूचना करून मी टाळयाच्या गजरात खालीं बसतो

(श्री मारुती मालीशवाला आभार मानण्यासाठी उठतो )

मारुतीराव:- मायबापानो, तुम्हा सर्वांचे आभार कसे मानावे याचे मला कोडेंच पडले आहे तुम्ही मला एका दिवसात श्रीमंत करून सोडले आहे आता माझ्या सगळ्या अडचणी दूर होतील माझा कोट आणि छत्री मारवाड्याकडे गहाण आहे एका पठाणाचे मला पाच रुपये कर्ज आहे उधारीत तेल आणून वाण्याचे तीन रुपये देणे झाले आहे काल रात्री पंजावर बारा आणे लाविले, तेहि उधारींत ! आता मला मिळालेल्या सात हजार रुपयातून

हें कर्ज फेडू शकेन ही देवाचीच कृपा होय ! मी हे शब्दकोडें सोडविण्यात दाखविलेल्या अक्कलहुषारीबद्दल माझी खूप तारीफ करण्यात आली आहे, पण मायबापानो, मी तुम्हाला खरें सागतो यात माझी काहीं हुषारी नसून तो एक योगायोग आहे एक दिवस रात्री चौपाटीवर मी एका गिऱ्हाइकाचे डोकें रगडीत असता त्यास झोप लागली आणि त्याच्या हातांतील एक कागद गळून पडला ! मी तो उचलून पहातो तर त्यात कोडें सोडविलेले ! त्याच कागदाने आजचा भाग्याचा प्रसग निर्माण केला आहे ! मला त्या गिऱ्हाइकाची दया येते ! त्याला बुडवून मी श्रीमत झालो हें काही चागले नाहीं ! यापुढें तेल मालीशचा धदाच सोडून देऊन हे पैसे घेऊन मी दूर दूर कुठेंतरी निघून जाणार आहे रामराम मडळी, रामराम !

□□□

## ' आम्हांला मरायला काय झालें ? ' : २३

(यमदेवाचा दरबार. यमदेव रेड्यावर बसला असून नवीनच आलेल्या मृतात्म्याची चौकशी करीत आहे.)

यमदेव– कोण गावचा रे तू ?

मृतात्मा– मी बिहारमधला.

यमदेव– उपासमारीनें मेलास ?

मृतात्मा– कोण म्हणतो ?

यमदेव– तुझं दैव म्हणत, भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर तीन वर्षांत तूं उपासमारीने मरणार, असं तुझ्या ललाटात ब्रह्मदेवान लिहिलं आहे.

मृतात्मा– साफ खोट ! विधिलिखित वाटेल तें असेल, पण मी नाहीं अन्नान्न म्हणून मेलों नाहीं.

यमदेव– मग कशानें मेलास तू ?

मृतात्मा– भाव वाढीमुळें !

यमदेव– आश्चर्य आहे. माझ्याकडे तर असा अहवाल पाठविण्यांत आला आहे, कीं बिहारमध्यें भागलपूर, पूर्णिया, मोंघीर, दरभंगा इत्यादि भागात अन्नदुष्काळ असून उपासमारीनें तेहतीस लोक मेले आहेत.

मृतात्मा– ती एक अफवा आहे. तीस चाळीस लोक मेले आहेत ही गोष्ट खरी, पण ते उपासमारीनें मेले असे म्हणता येत नाहीं. माझ्यापुरतें सांगायचे तर मी भाववाढीमुळें मेलो आहे !

यमदेव– मरण्यापूर्वी तू जेवला होतास कां ?

मृतात्मा– नाहीं. मी कधीं जेवलों तें मला आठवत नाहीं. त्याला बरेच दिवस झाले असतील.

यमदेव– म्हणजे तूं उपासमारीनेच मेलास की !

मृतात्मा– नाहीं. मी पुन्हा पुन्हा सागतों कीं माझ्या मृत्यूचें कारण भाववाढ ! गावात अन्न भरपूर होतें, पण भाववाढीमुळ तें अन्न विकत घेण्याचे मला त्राण नव्हतें.

यमदेव– तू एवढा खुलासा केलास हें चागले झाले. नाहींतर सरकारच्या नालायक कारभाराला मी ठपका दिला असता. पण आता मी तुलाच ठपका देतों. हिंदुस्तान स्वतत्र झाला असताना अवघ्या तीन वर्षांत तुझ्यासारख्या तरुणानें मरून जावें. हें चागले नाही.

(दुसरा एक म्हातारा मृतात्मा प्रवेश करतो.)

म्हातारा– महाराज, मी आलो आहे.

यमदेव– या आजोबा ! तुम्हीहि खलास झाला काय ? काठी कुठं आहे तुमची, आजोबा ?

म्हातारा– तिकडेच ठेवून आलों आता स्वर्गांत काठी कशाला ?

यमदेव– तुम्हाला मरायला काय झाल आजोबा ? घरात पोर टोरें रडत असतील !

म्हातारा– रडायला कुणी शिल्लक नाहीत ! अहो, मरताना कोणी मला पाणीसुद्धां पाजल नाही !

यमदेव– भाग्यवान आहात ! पण तुम्ही मेलात कसे ? कारण काय ?

म्हातारा– त्याचाच मी विचार करतोय. मी मेल्यानतर वर्तमानपत्राचा एक अक पाहिला. त्यात मी उपासमारीनें मेलों अस लिहिल होत ! साफ खोटं ! हे वर्तमानपत्रवाले मोठे लबाड ! त्याना नीति नाहीं, सत्य नाही–

यमदेव– मग तुम्हीच सत्य सागा ! तुमच्या मृत्यूचे कारण काय ?

म्हातारा- म्हातारपण ! दुसरे काय कारण असणार ! मी म्हातारा माणूस ! म्हातारपणामुळें मेलो

यमदेव– पण तुम्हीं जरा घाईच केलेली दिसते. तुमच्यापेक्षां कितीतरी म्हातारे लोक हिंदुस्तानात चैन करताहेत, मोटारींतून हिंडताहेत, मानपत्रें घेताहेत, मेजवान्या झोडताहेत !

म्हातारा– पण मी आपला मरून मोकळा झालों. नागरीक-स्वातंत्र्याच्या दृष्टीनें कुणालाहि मरण्याचा हक्क आहे. जगलेच पाहिजे असा

जुलूम नाही आपल्या स्वतंत्र भारतात ! फक्त आत्महत्या न करता कायदे-शीर मेलें म्हणजे झाले !

यमदेव– पण कायदेशीर जगण्याची सोय आहे का ? राज्यातील प्रत्येक नागरिकाला अन्न, वस्त्र आणि आसरा मिळालाच पाहिजे असा कायदा आहे

म्हातारा–पण ह्या गोष्टी कमी महत्वाच्या आहेत राष्ट्रापुढें मोठ मोठे प्रश्न आहेत दारूबदीचा प्रश्न आहे झाडें लावण्याचा प्रश्न आहे अन्नाचें आणि वस्त्राचे काय घेऊन बसलात ?

यमदेव– मरताना तुम्हाला भूक लागली होती का ?

म्हातारा– ते काय विचारता ? सपाटून लागली होती ! रेशनकार्ड-सुद्धा खाऊन टाकल !

यमदेव– काय म्हणता ?

म्हातारा– नाहींतर तें कार्ड काय करायचं ? कार्डावर धान्य घ्यायला पैसे पाहिजेत ना ? भूक लागली तेव्हा रेशनकार्डच गिळून टाकल !

यमदेव– म्हणजे तुम्हीं उपासमारीनच मेलात हें सिद्ध होत !

म्हातारा– नाही देवा ! मी मेलो म्हातारपणामुळें ! आमच्या देशात धान्याचा सुकाळ करण्याच्या मोठमोठ्या योजना चालू आहेत पण त्या योजना अमलात येण्यापूर्वीच माझा प्राण गेला, कारण तोपर्यंत धीर धर ण्याची ताकद माझ्या म्हाताऱ्या शरीरात कुठली ? याचा अर्थच हा की मी म्हातारपणामुळें मेलो

यमदेव– तुम्हीं हा फार चांगला खुलासा केलात आजोबा ! नाहींतर माझा गैरसमज झाला असता ! तुमचा ललाटलेख लिहिणाऱ्या त्या विधा-त्याची अक्कल कुठे गेली कळत नाही तुमच्या कपाळावर लिहितो काय कीं उपासमारीन मृत्यू ! सपादकाप्रमाणें खोट खोट लिहितो हा ब्रह्मदेव !

(क्षयरोगाने मेलेला एक आत्मा प्रवेश करतो )

क्षयरोगी– माफ करा ! आमंत्रणाशिवाय मी आलों आहे

यमदेव– हरकत नाहीं पूर्वी मला आमंत्रण द्यावे लागत असे पण हल्लीं इतका गोंधळ झाला आहे की आमंत्रणाची जरुरीच नाहीं कुणीहि आपल उठाव आणि मराव ! माणसाच्या जीवाला किंमतच उरली नाहीं तू तरुण मुलगा दिसतोस ! बिहारचाच काय ?

क्षयरोगी– होय मी पूर्णिमा जिल्ह्यातला नुकतेच जे तेहतीस लोक मेले त्यापैकींच मी एक आहे

यमदेव– म्हणजे तू भूकबळीच !

क्षयरोगी– नाही मी क्षयबळी आहे मी क्षयरोगाने मेलो आहे !

यमदेव– क्षयरोगाच्या तीन अवस्था असतात असे मी ऐकतो तुझी अवस्था कोणती ?

क्षयरोगी– तिसरी ! स्वातंत्र्याच्या पहिल्या वर्षांत पहिली अवस्था, दुसऱ्या वर्षांत दुसरी अवस्था आणि तिसऱ्या वर्षांत पूर्ण निकाल लागला !

यमदेव– उपचारासाठी इस्पितळात वगैरे गेला होतास की नाही ?

क्षयरोगी– गेलो होतो पण इस्पितळात फार गर्दी असल्यामुळें मरे-पर्यंत तिकडे ठेवून घेत नाहीत

यमदेव– विहारमध्यें तुझ्याबरोबर आणखी बत्तीस लोक मेले त्या-सबधी तुला काही माहित आहे का ?

क्षयरोगी– होय एक इसम भाववाढीमुळें मेला, एक इसम म्हातार-पणामुळें मेला, एक इसम विंचू चावल्यामुळें मेला, एक इसम झोपेंतच मेला, एक इसम कॉलरा झाल्यामुळें मेला !—!

यमदेव– उपासमारीने कोणीच मेला नाही तर !

क्षयरोगी– नाव काढू नका ! तसा अन्नाचा दुष्काळ मुळीच नाहीं काहीं खेड्यापाड्यातून तीव्र तुटवडा भासत असेल, पण एकंदर देशात अन्नाचा साठा भरपूर आहे सरकारी हिशेबात जोपर्यंत साठा भरपूर आहे, तोंपर्यंत खेड्यातल्या लोकानीं उपाशी मरण्याचे काहींच कारण नाही

यमदेव– हे मेलेल्या तरुणा, तुला राजकरणाचे फारच ज्ञान आहे याबद्दल मी तुझें अभिनंदन करतो पण मला असे वाटतें कीं राजकीय विचा-रापेक्षा तुझ्या दुर्बल शरिराला थोडें अन्न मिळाले असतें तर तुला हा क्षय-रोग झालाच नसता ! माझी समजूत आहे कीं उपास तापास काढूनच तुला क्षयाची बाधा झाली !

क्षयरोगी– नाही !

यमदेव– मग तुला क्षयरोग कसा झाला ?

क्षयरोगी– क्षयाचे जंतु शरीरात शिरल्यामुळें

यमदेव– दूध, अंडी वगैरे पौष्टिक आहार व योग्य औषधोपचार तुला लाभला असता तर हें अकाली मरण तुझ्यावर ओढवले नसतें

क्षयरोगी– दुधाच्या योजना आणखी पाच वर्षांनी पुऱ्या व्हावयाच्या आहेत आणि कोंबडयाच्या धद्याकडे सरकारचे अजून लक्ष गेले नाहीं.

यमदेव– बैलानी खावयाची पेंड आणि सरकी याच्यामध्येंहि सत्वाश असतो असे मी ऐकले आहे तुला तें सकस अन्न मिळाले नाही का ?

क्षयरोगी– आम्ही माणसानी तें अन्न खाल्ले तर जनावराची उपासमार होणार नाही का ?

यमदेव– खरच ! हा अन्न प्रश्न मोठा गुतागुतीचा आहे पण मी म्हणतो, केळघाच्या सालामध्यें सत्वाश खूप असतो म्हणून त्या साली फेंकून न देता त्याची चटणी करून खाण्याचे प्रयोग माणसानी सुरू केले आहेत, ही गोष्ट खरी का ?

क्षयरोगी– होय भाजीपाला जमिनीतून उपटल्यानतर तो धुवून खावा की तसाच खावा याविषयींहि सध्या चर्चा चालू आहे कारण, भाजीच्या मुळाना जी माती लागलेली असते, ती मध्ये जीवनसत्वे असतात, असा शोध लागला आहे

यमदेव– सत्वयुक्त पदार्थांचे इतके ज्ञान असूनहि तू क्षयरोगाने मेलास हें आश्चर्य होय ! आयुष्यात तुला पोटभर अन्न कधीच मिळाले नाहीं उपास-तापास काढूनच तुला क्षयरोग जडला म्हणून तू उपासमारीनेच मेलास असे मी समजतो

क्षयरोगी– उगीच खोटी अफवा पसरवू नका ! उपासमारीने मला क्षय-रोग झाला असेल, पण उपासमारीने मी मेलो नाही मी क्षयरोगानेच मेलो आहे गेल्या आठवडयात आत्यतिक भुकेने मी कासावीस झालो आणि शेवटीं अन्न अन्न म्हणून तडफडत प्राण सोडला, ही गोष्ट खरी पण माझ्या प्रेताकडे पाहिल्यानतर हा क्षयाचा मृत्यू आहे, हें कोणताहि शहाणा डॉक्टर सागू शकेल !

( एका भिकारी स्त्रीचा मृत आत्मा प्रवेश करतो )

भिकारीण– दया करा शेठ ! गरीब, लाचार, उपाशी–

यमदेव– काय ग, मेल्यानतरसुद्धा तू भीक मागतेस ?

भिकारीण– काय करणार ! जित्याची खोड मेल्यानंतरहि जात नाहीं !

यमदेव– काय ग ? तुझ्या कडेवरच मूल कुठें आहे ?

भिकारीण– तें स्वतंत्र हिंदुस्थानात ठेवून आले आहे. एखाद्या अनाथालयात त्याची सोय लागेल.

यमदेव– किती दिवसापासून तूं भीक मागतेस ?

भिकारीण– स्वराज्य की काय आपल्याला मिळाल ना, तेव्हापासून भीक मागण्याचा धंदा मी सुरूं केला.

यमदेव– भीक मागणें हा गुन्हा आहे हें तुला माहीत नाही ? राष्ट्राला तुमचा बोजा कसा सहन होणार ?

भिकारीण– म्हणूनच तो बोजा हलका करण्यासाठी मी स्वर्गांत आले. पण मला वाटतें, आमच्यासारख्या मरतुकड्या भिकाऱ्यापेक्षा गलेगठ्ठ काळाबाजारवाल्याचा बोजा राष्ट्राला फार होतो.

यमदेव– बिहारमध्यें मेलेल्या तेहतीस लोकांपैकीच तू एक आहेस ना ? मग तूं उपासमारीनें खास मेली नसशील !

भिकारीण– छे ! आमच्यापैकीं कोणीच उपासमारीनें मेले नाहीत. अन्नटचाई असणाऱ्या खेड्यापाड्यात आता पन्नास सरकारी दुकानें उघडलीं आहेत. आणि पुढील आठवड्यात भाव उतरण्याचीहि आशा आहे. पण इतके लोक उगाच घाईघाईनें मेले ! आपल्या देशातील लोक इतके उतावळे कीं अधिकाऱ्यांनी कांहीं व्यवस्था करण्यापूर्वीच मरून जातात.

यमदेव– तुझ्या पोटात अन्नाचा कण नाही अशी मला शंका आहे. खरं सांग, तूं उपासमारीनें मेलीस काय ?

भिकारीण– आता मेल्यानतर त्याची चौकशी करण्यात काय अर्थ ! पण माझ्या मृत्यूमुळें सरकारच्या इभ्रतीवर आणि पुढील निवडणुकीवर परिणाम होऊं नये अशी माझी इच्छा आहे.

यमदेव– भिकारीण असूनहि तुला राजकारण बरेंच कळतें ! आता तुझ्या मृत्यूचें कारण काय तें सागून टाक !

भिकारीण– कुत्रा चावल्यामुळें मला मृत्यू आला.

यमदेव– कुत्रा का चावला ?

भिकारीण– कारण रस्त्यातल्या एका उष्ट्या पत्रावळीसाठी त्याचे

आणि माझें भांडण लागलें. पण तो कुत्रा माझ्यापेक्षां भुकेला होता ! त्यानें माझा कडकडून चावा घेतला आणि मी मेलें !

यमदेव– तुझा हा समाधानकारक खुलासा ऐकून मला अत्यंत आनंद होत आहे. मेलेल्या तेहतीस लोकांपैकी कोणीहि उपासमारीनें दगावलें नसून, भाववाढ, म्हातारपण, आजार, क्षयरोग, श्वानदंश इत्यादि वेगवेगळया कारणानी मेले आहेत; याबद्दल माझी पूर्ण खात्री झाली आहे.

□□□

# अरे चोरा, घे सोन्याचीं बटणें :२४

अरे चोरट्या, तू माझ्या मागे दबकत दबकत चालतोस. याचा अर्थ काय? माझ्या सोन्याच्या बटणावर तुझा डोळा आहे काय? रस्त्यात मला सुरा दाखवून माझ्या अगावरील सोन्याची बटणे लुबाडण्याचा तुझा विचार आहे काय? नाही रे बाबा, देवाची शपथ, ही बटणें सोन्याची नाहीत! अरे, मला पगार तो काय? आणि मी सोन्याची बटणे वापरणार काय? आमचे मालकसुद्धा सुताच्या गुंड्या वापरतात. आणि मी कोठून सोन्याचीं बटणे आणणार! अरे, सुरा काय दाखवतोस? ही सोन्याची बटणें नाहीत! अरे बाबा, ही पितळेचीं बटणे आहेत. सोन्याचा मुलामा चढविला आहे वर! नीट बघ! चकाकतं तें सारं सोनं नसतं! अरे बाबा, तुला सोनं कोणतं आणि पितळ कोणतं याची पारख नाही तर येत्या निवडणुकीत तू कुणाला रे मत देणार? कित्येक लोक अगावर खादीचा मुलामा चढवतात, म्हणून काय ते सच्चे देशभक्त असतात? भल्या माणसा, तुला अस्सल काय आणि नकली काय हें कळत नाही! कसं होईल रे आपल्या देशाचं? अरे, सुरा काय माझ्या छातीला लावतोस? माझी छाती ती केवढी आणि तुझा सुरा तो केवढा! अरे, टीचभर छातीला हातभर सुरा काय करायचा आहे? आणि बाबा, ही साहित्यिकाची छाती आहे! अनेक करुण लेख लिहून लिहून छाती फाटून गेली आहे आणि तू कशाला रे त्या भग्न छातींत सुरा खुपसतोस? अनेक निर्दय तरुणींनी ही छाती घायाळ केली आहे आणि तू कशाला रे ती पुन्हा घायाळ करतोस? अरे बाबा, जरा हळू! सदरा ओढू नकोस! फाडू नकोस! खर सागतों ही पितळेची बटण आहेत! याची

किंमत बारा आण्यापेक्षा जास्त नाही तुला बारा आण्याची बटणे काय करायची आहेत ? रस्त्यात सुरा दाखवून धाडसी लूटमार केली आणि पदरात पडले काय, तर बारा आण्याची पितळेची बटणे ! अरे, उद्या वर्तमानपत्रात ही बातमी छापून आली तर हसतील ना तुला सारे लोक ! गावात तोंड दाखविण्याची तुला सोय आहे काय ? अरे, बारा लाखाचा दरोडा घालण्याचे सोडून तू बारा आण्याची बटणे पळवतोस, हें शोभते का तुला आणि तुझ्या प्रतिष्ठेला ? अरे बाबा, तुझी सस्कृति काय, भारताची परपरा काय, तुझ्या शूर पूर्वजानी तळहातावर शिर घेऊन आणि छातीचा कोट करून ! अरे अरे, कोट काय ओढतोस माझा ? खिसे काय चाचपतोस ? खिशात काही नाही ! पगार झाला नाही रे ! देवाची शपथ, पगार झाला नाही ! मी खोट सागत असल्यास माझ्या बायकोला जाऊन विचार ! पगार झाला तर प्रथम ती लुबाडते मग तुम्हा चोराना लुबाडायला काय शिल्लक उरणार !

× × ×

अरे चोरा, तू सगळ सोडून आज माझ्या वाटस का आलास ? तुला दुसरा कोणीच का भटला नाही ? तुला मी मत्री वाटलो, की पुढारी वाटला, की न्यायमूर्ति वाटलो ? अरे बाबा मी एक गरीब पत्रकार आहे माझा बावळट चेहरा आणि गबाळ पोषाख पाहून तुला मी कोणीतरी थोर व्यक्ति वाटलो असेन, पण चोरा मी तसा नाहीं रे ! माझ्या सदऱ्याला सोन्याची बटणे आहेत असा तुझा गैरसमज झाला असेल तर मी साफ सागतो कीं, ती सोन्याची बटणे नाहीत ! आम्हा साहित्यिकाचा आणि सोन्याचा सबध काय ? आमचे काही वाङमय सुवर्णाक्षरानी लिहून ठेवण्या सारखें असते ही गोष्ट खरी, पण प्रत्यक्ष आम्ही तें शाईनेंच लिहीत असतो सूर्याचीं सोनेरीं किरणे आणि समुद्राच्या रुपेरी लाटा अशा उपमा देण्यापुरताच सोन्याचादीशीं आमचा व्यवहार असतो अरे बाबा, कोट कशाला चाचपून पाहतोस ? हा कोट माझा नाहीं ! माझ्या सासऱ्याचा कोट आहे हा ! माझा स्वत चा कोट एका नाजुक ठिकाणीं हरवला हें तुला माहीत नाहीं काय ?

अरे बाबा, हिसका काय दतोस ? तो सुरा जरा मागें घे ! या खिशात काही नाहीं त्या खिशात काही नाही आतल्या खिशात म्हणतोस ? तें बडल नोटाच नाहींं ! ते लेख आणि कविता आहेत वाटल्यास तू ते घेऊन जा ! आम्हा साहित्यिकाजवळ दुसर काय असणार ! पण तुला चोराला साहित्याचे मूल्यमापन कस करता येणार ? अरे बाबा, तिकडे दाबू नकोस ! त्या खिशात फुले आहेत ! म्हणजे रस्त्यात गळून पडलेली फुले आहेत ! पूर्वी सुदर स्त्रियाच्या वेण्यातून गळून पडलेल्या अशा फुलावर मी कविता करीत असे, पण आता आपल्यात काव्य राहिले आहे कुठें ? आता प्रतिभा आटली आता फक्त फुलेच गोळा करतो ! काव्य गेले आणि फुले मात्र राहिलीं आहेत ! अरे, तू एवढा आडदाड कसा ? तुझा सुरा लागला तर या नाजुक फुलाचा चेदामेंदा होईल ना ?

* * *

अरे चोरट्या, पाच वर्षांपूर्वी तू जर मला या रस्त्यात भेटला असतास तर तुला माझ्या या खिशात नोटा आणि त्या खिशात खुर्दा सापडला असता ! त्यावेळी इग्रजाच राज्य होत ! गेले ते दिवस ! ते दिवस गेले आणि ते वैभवहि गेले ! अरे, इग्रजाच राज्य असताना तुम्ही चोर कुठ होता ? आणि आता रामराज्य झाल्याबरोबर सारे चोर एकदम कुठून उपटले ? इग्रज गेले आणि चोर आले, हें कस काय झाले ? चोराचा सुळसुळाट का व्हावा ? अर बाबा, जरा हळू ! पुन्हा पुन्हा सुरा का दाखवतोस ? लक्षात ठेव मी साहित्यिक आहे तुझ्या सुरीपेक्षा माझ्या लेखणींत अधिक सामर्थ्य आहे. लेखणी ही तलवारीपेक्षा अधिक सामर्थ्यवान आहें हें तुला माहित नाही काय ? मोठमोठे पुढारी आणि मत्रीसुद्धा आमच्या लेखणीला वचकतात ! आणि चोरा, तू कसा भीत नाहीस ? आता वर्तमानपत्राच्या कचेरीत जाऊन जर मी तुझ्यावर टीका करीन तर तू चारीमुडी चीत होशील ! अरे पण हो माफ कर ! बरगडीत खुपसू नकोस सुरा ! तुझें वर्तन अहिंसला सोडून आहे हिंसा हें पाप आहे हे तुला कळत कसे नाहीं ? आमचे वदनीय पुढारी काय सागतात ? नैतिक पातळी वाढवा, अहिंसा पाळा, विधायक काय करा ! तुम्हा चोराच्या मनावर काहीच का रे परिणाम होत नाहीं या उपदेशाचा ? आमचे पुढारी–मेलो ! मेलो ! अरे बाबा, पुढाऱ्याचे नाव काढल्याबरोबर

तू मला ठोसा हाणलास की! एवढा का राग आहे तुला पुढाऱ्याचा? सध्याच्या सरकारविरुद्ध जर तुला इतकी चीड आहे तर घटनात्मक मार्गांनी तू हें सरकार बदलून घेऊ शकनोस लवकरच निवडणुका होणार आहेत! अरे, माझ्या तोंडात बोळा का कोंबतोस? मी आरडाओरडा करीन आणि पोलिसाना बोलावीन अशी तुला शका आली काय? नाही रे बाबा! कशाला विनाकारण ओरडू! देवीची शपथ, मी ओरडणार नाही ओरडायला नरड्यात ताकद आहे कुठें? आणि ओरडल तरी कोण धावून येणार इथें? तुझ्याजवळ दारूची बाटली नाही ना? मग तुला कोण पकडणार? तुझ्या जवळ फक्त तीक्ष्ण सुराच आहे! तो काही गुन्हा नाही बर! तुला जें काही घ्यायचे असेल तें काढून घे! ही घे सोन्याची बटणे! हा घे भोकाचा कोट? हें लेख आणि कविता! ही वेणींतून गळून पडलेली फुले! ह्या विड्या आणि ही काडी! बाबा रे, प्रत्येकानें राम बनले पाहिजे, तरच रामराज्य होईल!

□□□

# चंद्रनंतर



मुंबई शहरात अनेक गल्ल्या आहेत, अनेक बोळ आहेत, अनेक चाळी आहेत, अनेक वाड्या आहेत; पण रेवडी गल्लीसारखी दुर्दैवी दुसरी नाही, रेवडी गल्लीसारखी कमनशीबी गल्ली आढळणार नाहीं.

कालपरवापर्यंत गल्ली हंसत–खेळत होती. कालपरवापर्यंत गल्ली नाचत–बागडत होती. गल्लींत आनंदाचें साम्राज्य पसरलें होतें. पण कुणा पाप्याची दृष्ट लागली कुणास ठाऊक! गल्लीवर अकस्मात् संकट कोसळलें! रेवडी गल्लीवर येऊं नये ती आपत्ति ओढावली!

म्हणजे रेवडी गल्लीत देवीची किंवा विषमज्वराची सांथ पसरली आहे, असें नाही. कुठें आग लागली, इमारत कोसळली, घातपात–अपघात झाला असेंहि नाही. कुणाचे बरे–वाईट झाले, कुणाची सासू किंवा म्हातारी दगावली, असाहि प्रकार नाहीं मग रेवडी गल्लीत जी आज दुःखाची आणि चिंतेची भयाण छाया पसरली आहे, तिचें कारण काय? गल्लींत ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत जी अवकळा दाटली आहे, तिचे रहस्य काय? गल्लीला डागण्या देणारी ती घटना कोणती?

जरा कान देऊन ऐका म्हणजे कळेल. जरा डोळे उघडून पहा, म्हणजे समजेल. रेवडी गल्लींत एक फेरफटका मारा म्हणजे सारा उलगडा होईल.

रेवडी गल्लीतील रहिवाश्यांमध्यें एकच कुजबूज चालली आहे, 'चंद्रनंतर कोण?'' गल्लीत जिकडे तिकडे एकच चर्चा, एकच विषय, 'चंद्रनंतर कोण?'

गल्लींतील तमाम बिऱ्हाडांमध्यें, नळावर, गच्चीवर, जिन्यावर, एकच

सवाल, 'चंदूनंतर कोण ?' स्त्रियांना, मुलांना, तरुणांना, वृद्धांना, गल्लीतील तमाम मंडळींना सतावणारा एकच एक प्रश्न आणि तो हा कीं, 'चंदूनंतर कोण ?'

नवरा हपीसातून घरी येताच बायकोला विचारतो 'काय ग, चंदूनंतर कोण ?'

बायको चौपाटीवर भेळ खाताना नवऱ्याला विचारते, 'काय हो चंदूनंतर कोण ?'

मुलगा शाळेंतून घरी येताच आईला विचारतो, 'आई, चंदूनंतर कोण ?'

ह्या प्रश्नाला कोणीच उत्तर देऊ शकत नव्हता सार्‍या रेवडी गल्लीला निरुत्तर करणारा हा महाकठीण प्रश्न होता

चंदू चळवळे हें रेवडी गल्लीचे मोठें प्रस्थ होतें गल्लींत त्याच्यासारखा लोकप्रिय आणि कर्तबगार कार्यकर्ता दुसरा नव्हता. रेवडी गल्लीचा तो स्वयसिद्ध आणि जन्मजात पुढारी होता रेवडी गल्लीचा कोणताहि कार्यक्रम चंदूच्या नेतृत्वाशिवाय पार पडत नसे गल्लीचा कोणताहि समारंभ चंदूच्या मार्गदर्शनाशिवाय तडीस जात नसे गल्लीचा गणपती उत्सव, सत्यनारायण, लग्नसमारंभ, प्रेतयात्रा स्नेहसमेलन, नाटयप्रयोग, सारे काही कार्यक्रम चंदूच्या लुडबुडीशिवाय झाले, असे कधी झालेच नाहीं चंदू चळवळे म्हणजे रेवडी गल्लीची उत्सवमूर्ति ! रेवडेगल्लीची स्फूर्ति आणि चैतन्य ! चंदू चळवळे हा मोठा अजातशत्रू आणि लोकप्रिय पति-पत्नीचा घटस्फोट असो, नळावरचे भांडण असो अगर साहित्यविषयक चर्चा असो, राजकीय मतभेद असोत, चंदू चळवळे याने मध्यस्ती केली की सारे प्रकरण गोडीगुलाबीने मिटत असे व तडजोडीचे वातावरण निर्माण होत असे थोडक्यात सांगायचे म्हणजे चंदू म्हणजे रेवडी गल्ली व रेवडी गल्ली म्हणजे चंदू !

असा हा रेवडी गल्लीचा लोकोत्तर पुरुष आज आपली कर्मभूमि सोडून दूर, दूर आपल्या जन्मभूमीकडे जाणार होता कोकणात आपल्या गावीं जाऊन कायम वास्तव्य करणार होता सेवानिवृत्त होऊन सर्वांचा निरोप घेणार होता चंदूनें चार दिवसापूर्वी आपला हा बेत गल्लीतील

मंडळींना कळविला तेव्हां सर्वांना विजेचा धक्का बसला. चंदू सेवानिवृत्त होतो म्हणजे काय ? आणि गल्ली सोडून कायम निघून जातो म्हणजे काय ? गल्लीचा एकमेव आधारस्तंभ निघून गेल्यावर गल्लीत काय राहिलें? गल्लींतून चंदू निघून जाणें आणि कुडींतून प्राण निघून जाणें सारखेंच ! चंदू गेला म्हणजे गल्लीची शोभा गेली, गल्लीचा आवाज गेला, गल्लीचें चैतन्य गेलें, गल्लीचें सर्वस्व गेलें. चंदूची जागा भरून काढणारा दुसरा कोणी मायेचा पूत रेवडी गल्लीत आहे ? चंदूची परंपरा चालविणारा दुसरा कोण पराक्रमी वीर गल्लीच्या परिसरात आहे ? छे ! चंदूसारखा चंदूच ! त्याला दुसरी तोड नाहीं, दुसरी जोड नाहीं ? राम वनवासाला जातांना सारी अयोध्यानगरी जशी शोकाकुल झाली, तशीच चंदू कोंकणांत जातांना सारी रेवडी गल्ली रडकुंडीस आली. चंदूचा वियोग हा गल्लीवर मोठाच वज्राघात होता.

पहिल्या माळ्यावरचे नाना मूर्छित पडले. दुसऱ्या माळ्यावरचे अण्णा चक्कर येऊन कोसळले. तिसऱ्या माळ्यावरचे तात्या छातीत कळ येऊन किंचाळले. तळमजल्यावरचे काकाजी अन्नपाणी सोडून उपास करूं लागले.

साऱ्या चाळीने सामुदायिक आकांत मांडला. गल्लीतल्या काही कवींनी शोकगीतें आळवायला सुरुवात केली.

चंदू चंदू जाऊ नको रे
दीनवाणिनें विनविति सारे
रडती महिला, रडतीं पोरें
रडती खिडक्या, रडतीं दारें
गाल चोळिती पुरुष बिचारे ॥
चंदू चंदू गल्ली-श्रेष्ठा
नको करूं रे निर्दय चेष्टा
नकोस हाणूं माली सोटा
ये माघारीं माझ्या बेटा
गल्लीचा तूं प्रकाश दिवटा ॥
तुझ्यामुळें गल्लींत चळवळी

नाही यापुढे माझ्या कार्याचा भार तुम्ही आपल्या शिरावर घ्या. तरुण रक्त पुढे येऊ द्या! आज रेवडी गल्लीला तरुण रक्ताची जरूरी आहे

बोलता बोलता चंदूचा कंठ दाटून आला कुणीतरी पुढे केलेला चहाचा गरमागरम कप घशात ढकलून त्यानें आपले भाषण बंद केले

शिष्टमंडळातील एक शिष्ट नाना भाषण करावयास उठले चंदूच्या दाढीला हात लावून ते म्हणाले,

" चंदूराया, तुम्ही म्हणता ते सारं ठीक आहे, पण तुमच्या मागून कोण तें तुम्हींच सांगा! तुमची जागा भरून काढणारा एक तरी कार्यकर्ता ह्या रेवडी गल्लीत आहे का ? "

" म्हणजे ? काय बोलता तुम्ही हें ? चंदू आवेशानं उसळून म्हणाला, ' नाना, चंदूनंतर कोण हा प्रश्न तुम्हाला का पडावा तेच मला समजत नाही तुम्ही स्वतः माझी जागा का भरून काढीत नाही ? ह्या रेवडी गल्लींत इतके मोठमोठे रहिवासी आहेत नाना आहेत, तात्या आहेत, बापू आहेत, काकाजी आहेत, करवटे आहेत, सुरवटे आहेत, करवटे आहेत, असं असताना चंदूनंतर कोण ही विवंचना पडावी ? किती शरमेची गोष्ट आहे ही! '

चंदूने अशी कानउघाडणी करताच शिष्टमंडळ खजील झाले नाना, तात्या, बापू, काकाजी वगैरे गल्लीकर मंडळी आत्मसंशोधन करू लागली. काही झाले तरी चंदूची जागा भरून काढण्यास आपण अपात्र आहोत, ह्याची त्यांना जाणीव झाली शिष्टमंडळातील एक एक शिष्ट उठून आपली असहाय्यता सांगू लागला!

*नाना*—कुठें चंदू आणि कुठें मी! चंदूनंतर मी गल्लीचा पुढारी होणे शक्य नाही सार्वजनिक कार्याला जे गुण आणि जी अक्कलहुषारी लागते ती माझ्यापाशी नाही!

मी हा आपुला गरीब नाना। चंदूसम मी नसे शहाणा॥
... व्यवहार कळेना। अफरातफरी मला जमेना॥

(उठतात तात्या आपले निवेदन करतात)

... चंदू कुठें मी! चंदूनंतर हा तात्या कसा पुढारी होऊ

## १३८ : आंवळ्या मोपळ्याची मोट

गडबडगुंडा साज सकाळीं
तुझ्यामुळें गणपती–दिवाळी
तुझ्यामुळें शिमगा अन् होळी
तुजविण गल्ली अश्रू ढाळी ॥

गल्लीचा आकांत चदूच्या कानावर गेला. ह्या रडारडीन चदूचे अत करण द्रवले पण करणार काय ? सेवानिवृत्त होण्याचा त्याचा निश्चय ठाम ठरला होता ह्या निर्णय बदलण्यास तो तयार नव्हता

, शेवटी गल्लीतर्फे एक शिष्टमडळ चदूच्या भेटीस गेले शिष्टमडळाने चदूची समजूत घालण्याचा प्रयत्न केला, चदूनेहि शिष्टमडळाची समजूत घालण्याचा प्रयत्न केला परस्पर समजूत घालण्याचा हा प्रयोग बराच वेळ चालला, पण कुणाचेच समाधान होईना

शिष्टमडळाला साष्टाग नमस्कार घालून चदू काकुळतीनें म्हणाला, "माझ्या गल्लीकर बधूनो, मला क्षमा करा माझें मन वळविण्याचा प्रयत्न करू नका माझा नाइलाज आहे गेली कित्येक वर्षे ह्या रेवडीगल्लीची मी यथाशक्ति आणि यथामति सेवा करीत आलो सार्वजनिक गणपती उत्सव, होळी, दसरासंमेलन, सत्यनारायण शिशुप्रदर्शन, पाकशास्त्र–स्पर्धा, वक्तृत्वाची चढाओढ, नाट्यप्रयोग सहली, हळदीकुकू, बक्षिस समारभ वगैरे असख्य कार्यक्रमानी रेवडीगल्ली मी दणाणून सोडली गल्लीतल्या लग्नसमारभात आणि प्रेतयात्रातहि मीच पुढाकार घेतला लग्नाचा माडव असो किंवा प्रेताची तिरडी असो, पहिला बाबू हातात धरून मीच आघाडीवर गेलो ह्या गल्लीत कित्येकाना खादा दिला आणि कित्येकाना खाद्यावर खेळविले, अशा प्रकारच्या नानाविध कार्यांनीं मी गल्लीला बारा महिने पुरून उरतो आपणहि माझ्या गुणाचे चीज करून योग्य ते सहकार्य दिलें माझी बरीवाईट सेवा गोड करून घेतली पण माझ्या मित्रानो, आतां मी म्हातारा झालो आहे थकला आहे मला विश्रातीची जरुरी आहे मी आपली रजा घेतो तुम्हा सर्वांचा निरोप घेताना मला अतिशय दुःख होतें माझ्या ह्या प्रिय रेवडीगल्लीचा त्याग करून दूर जाताना माझ्या अतःकरणाला यातना होतात, पण इलाज नाहीं यापुढें हा सार्वजनिक व्याप मला झेपणार

नाही यापुढे माझ्या कार्याचा भार तुम्ही आपल्या शिरावर घ्या तरुण रक्त पुढे येऊ द्या ! आज रेवडी गल्लीला तरुण रक्ताची जरूरी आहे

बोलता बोलता चदूचा कठ दाटून आला कुणीतरी पुढे केलेला चहाचा गरमागरम कप घशात ढकलून त्याने आपले भाषण रद्द केले

शिष्टमडळातील एक शिष्ट नाना भाषण करावयास उठले चदूच्या दाढीला हात लावून ते म्हणाले,

" चदूराया, तुम्ही म्हणता तें सार ठीक आहे, पण तुमच्या मागून कोण ते तुम्हीच सागा ! तुमची जागा भरून काढणारा एक तरी कार्यकर्ता ह्या रेवडी गल्लीत आहे का ? "

" म्हणजे ? काय बोलता तुम्ही हें ? " चदू आवेशाने उसळून म्हणाला, ' नाना, चदूनतर कोण हा प्रश्न तुम्हाला का पडावा तच मला समजत नाही तुम्ही स्वत माझी जागा का भरून काढीत नाही ? ह्या रेवडी गल्लींत इतके मोठमोठे रहिवासी आहेत नाना आहेत, तात्या आहेत, बापू आहेत, काकाजी आहेत, वरवटे आहेत, सुरवटे आहेत, करवटे आहेत, असे असताना चदूनतर कोण ही विवचना पडावी ? किती शरमेची गोष्ट आहे ही ! '

चदूने अशी कानउघाडणी करताच शिष्टमडळ खजील झाले नाना, तात्या, बापू, काकाजी वगैरे गल्लीवर मडळी आत्मसशोधन करू लागली. काही झाले तरी चदूची जागा भरून काढण्यास आपण अपात्र आहोत, ह्याची त्याना जाणीव झाली शिष्टमडळातील एक एक शिष्ट उठून आपली असहाय्यता सागू लागला !

नाना—कुठें चदू आणि कुठें मी ! चदूनतर मी गल्लीचा पुढारी होणे शक्य नाही सार्वजनिक कार्याला जे गुण आणि जी अक्कलहुषारी लागते ती माझ्यापाशी नाही !

मी ह्या आपुला गरीब नाना । चंदूसम मी नसे शहाणा ॥
*फंडगुड व्यवहार कळेना ! अफरातफरी मला जमेना !!*

( नाना पळतात तात्या आपले निवेदन करतात )

तात्या—कुठें चदू कुठें मी ! चदूनतर हा तात्या कसा पुढारी होऊ

शकेल ? चंदूची सर तात्याला येईल कशी ? चदू सारखा मी बेकार आणि रिकामटेकडा थोडाच आहे ?

चंदूसम मी नसें रिकामा । येइन कैसा तुमच्या कामा ॥
नसे चोंबडा फटिंग किंवा । नको पुढारीपण तें देवा ॥

( तात्या पळतात, बापू पुढे येतात. )

बापू- चदूसारखी योग्यता दहा जन्म घेतले तरी मला येणार नाही. मी आपला सज्जन पापभीरू माणूस ! चदूचें महान कार्य मला कसे झेपणार !

मी हा सज्जन, दुबळा बापू । चंदूसम नच उनाडटप्पू ॥
खिसे कुणाचे कैसे कापूं । चहा कसा मी मोफत चापूं ॥

( बापू पळतात, काकाजी उठतात. )

काकाजी– माफ करा ! चदूची जागा घेण्यास मी अगदीच नालायक आहे.

सनातनी मी कर्मठभारी । हिंडूं का मी घेऊनि पोरी ॥
नकोत मजला थिल्लर चाळें । गल्लींतून मी करीन काळें ॥

( काकाजी पळ काढतात. शिष्टमंडळातील शेवटचा वरवटे पुढें येतो )

वरवटे– सर्वांनीच पळ काढला. मग मी तरी कसा शिल्लक राहीन ?

चंदूराया चंदूराया । जाऊं नको रे पडतो पाया ॥
चंदू नंतर कुणी न वाली । चंदूवांचुनी भकास गल्ली ॥

सर्वांनीं माघार घेतलेली पाहून चदू सेवानिवृत्त होण्याचा बेत बदलतो आणि कार्याला लागतो.

□□□

## दोन दादांचा समेट : २६

शिवा आणि गोविंदा हे दोन दादा अधेरीनगरीत फारच माजून राहिले होते त्यांच्या दादागिरीने अधेरी नगरीचे नागरिक हैराण झाले होते हे दोन्ही दादा पूर्वी एकजुटीने वागत असत अतिशय गुण्यागोविंदानें आणि एक दिलाने आपले उद्योग करीत पण पुढें शिवा कांग्रेस पक्षात सामील झाला आणि गोविंदा कम्युनिस्टभाई बनला तेव्हापासून या दोन दादात दुफळी माजली. राजकीय मतभेदाबरोबर खाजगी वैमनस्य वाढले ते दोघे एकमेकाचे प्रतिस्पर्धी बनले गावात गुंडगिरी करण्याचे सोडून ते आता आपसात गुंडगिरी करू लागले भाडणतंटे, मारामारी, गुरामारी असे प्रकार होऊ लागले उभयतामधील तेढ विकोपास जाऊ लागली

शिवा आणि गोविंदा हे दोघेहि प्रत्येक बावतीत परस्पराचे प्रतिस्पर्धी होते हे दोघेहि गुड शक्तीने आणि गुडगिरीने तुल्यबलच होते पण त्यातल्या त्यात गोविंदा हा स्वत ला शिवापेक्षा जास्त शहाणा व ताकदवान समजत असे शिवापेक्षा चार इच छाती पुढें काढून तो नेहमीं चाले त्याची गर्दन रानडुकराप्रमाणे असून नुसत्या डोक्याच्या टकरीने मोठमोठ्या पेहलवानाना तो खाली लोळवीत असे शिवाहि काही कमी वस्ताद नव्हता बैलाचे बळ शिगात तर गाढवाचें बळ त्याच्या लाथेत असतें लाठीकाठी फिरविण्यात शिवा मोठा पटाईत होता आणि विरुद्ध पक्षाच्या दहावीस गुडाना तो एकटा वीर आपल्या लाठीने गल्लीपार हाकलून लावी

शिवा आणि गोविंदा हे एकमेकावर ताण करण्याचा नेहमी प्रयत्न करीत असत शिवाने एक पराक्रम केला तर त्याला खिजविण्यासाठी गोविंदा

क्षुप्पट पराक्रम करीत असे शिवाचा हातभट्टीचा एक अड्डा होता म्हणून गोविंदानें दोन अड्डे सुरू केले शिवाला एक बायको होती म्हणून गोविंदाने दोन बायका केल्या शिवाने आपल्या गल्लीत एक सार्वजनिक सत्यनारायण केला तर गोविंदाने दोन सत्यनारायण करून शिवावर कडी केली एका सार्वजनिक फंडाला शिवाने शभर रुपये दिले तेव्हा गोविंदाने दोनशें देऊन आपला वरचढपणा सिद्ध केला एका जेवणावळीत शिवाने वीस लाडू ... हें पाहून गोविंदानें चाळीस लाडू खाऊन शिवाला खजील केले ... जास्त मर्दुमकी गाजविणे हा गोविंदाचा छंदच होऊन बसला

दोन्ही दादा स्वतःला सार्वजनिक कार्यकर्ते व राजकारणी समजत होते आणि त्याच्या वेगवेगळ्या सभाहि भरत असत अशा वेळी एकमेकाच्या सभा उधळून लावणे आणि दंगल माजविणे हाहि त्याचा धंदा झाला होता शिवाच्या सभेंत गोविंदाने हुल्लड माजवायची आणि गोविंदाच्या सभेंत शिवाने गडबड करायची हे प्रकार नेहमी चालत असत त्यामुळें गावातले सभ्य नागरिक कुणाच्याच सभेस हजर राहात नसत निवडणुकीच्या वेळी तर प्रत्येक सभेला कुस्तीच्या आखाड्याचे स्वरूप येई आणि ... डोकीं सहज फुटत

या दोन दादाच्या दंगामस्तीने अघेरनगरीचे लोक अगदी विटून गेले होते गावात मधून मधून तंग वातावरण निर्माण होई यामुळे गावातले एक लहानसे वर्तमान चांगले चालले होते पण इतर धंदे बसले होते. या दोन दादाचा प्रत्यक्ष असा उपद्रव गावकऱ्याना होत नव्हता, तरी त्याच्या आपसातील दगडफेकीचा प्रसाद इतराना मिळत असे गावात एकहि घर किंवा इमारत धड नव्हती कुठें कौले फुटलेली, कुठें खिडक्याची तावदाने निखळलेलीं, कुठें भिंतीला भगदाड पडलेले, दृश्य दिसे शिवाय, रस्त्यावरून जाणाऱ्या निरपराध माणसाच्या टाळक्यावर कधीं सोडावॉटरची बाटली किंवा धोंडा आदळेल याचा नेम नव्हता

गावात एक छोटी पोलीस चौकी होती पण दंग्याच्या वेळीं नेमके तेथें पोलीस सापडत नसत शहरात जाऊन वरिष्ठ पोलीस अधिकाऱ्याकडे तक्रार करावी, असे गावकऱ्याना वाटत असे, पण धैर्य होत नसे. कारण

…नाच त्या दोन दादाचा भयकर धाक होता पोलिसाकडे कायद्याने करणे …जे स्वत वर प्राणसकट ओढवून घेणे होय, ही त्याना माहित होते.

शेवटी, या दोन दादामध्ये काहीतरी समेट घडवून आणला पाहिजे …ब, असा विचार गावातील चार शिष्ट लोकाना सुचला. ……त्याच्या अध्यक्षतेखाली एक शिष्टमडळ नेमण्यात आले आणि हे शिष्ट …न्या शातता–कार्याला तावडतोब लागले शिष्टमडळामध्ये एक रेडडो…ा, एक गडेरीवाला, एक वेकार वकील एक स्थानिक सपादक आणि गावचे पाटील इतकी सामान्य मडळी होती.

शिष्टमडळ प्रथमच शिवाच्या भेटीला गेले त्यावेळी शिवा आपल्या …भट्टीच्या कामात गढून गेला होता शिष्टमडल विचकत विचकत आत …ले तिथल्या एका मोठ्या पिपावर शिष्टमडळाचे अध्यक्ष बसले आणि …ाच्या डबड्यावर इतर समासद विराजमान झाले

शिवाने अतिशय प्रेमाने शिष्टमडळाचे स्वागत केले आणि प्रत्येक …ासदापुढे त्याने एक एक वाटली ठेवली नतर आपल्या नोकरास कोब…्या जेवणाची ऑर्डर दिली शिष्टमडळ एकदम खूष झाले. अध्यक्षानी …वात केली.

' शिवा, आम्ही गावकन्यातर्फे प्रतिनिधी म्हणून आलो आहोत तुमच …णि गोविंदाच भाडण मिटाव आणि दोघामध्ये समेट व्हावा ही आमची …च्छा आहे '

'त्या हरामखोर गोविंदाबरोबर माझा समेट होणे शक्य नाही ! अहो, …ी एक अड्डा चालवतो, तर तो दोन अड्डे चालवतो. मी एक बायको केली …र तो दोन करतो. तुम्हीच सागा, अशान समेट होणार कसा ?'

'गोविंदा हरामखोर आहे, पापी आहे, हें आम्ही कबूल करतो म्हणू…च तुमच्यासारख्या सज्जनान त्याच्या नादी लागणें बरे नाहीं '

शिष्टमडळातल्या वकिलानेहि आता पुस्ती जोडली ते म्हणाले, 'शिवा, …ुम्हीं देशभक्त ! हातभट्टीसारखा पवित्र धदा करता ! तुमच्यासारख्या प्रति…ष्ठत समाजसेवकाने गोविंदासारख्या एका नादान गुडाबरोबर भांडत …, राष्ट्राचे दुर्दैव आहे हा झगडा मिटलाच पाहिजे !'

गडेरीवाला म्हणाला, 'जागतिक शांततेच्या दृष्टीनेहि अंधेरीनगरीतील हे भांडण मिटले पाहिजे शिवा, तुमच्या काय अटी असतील त्या सांगा! आम्ही त्या अटी गोविंदापुढें सादर करू '

बराच वेळ वाटाघाटी चालू होत्या बाटल्या संपल्यानंतर वाटाघाटी संपल्या भरपूर मेजवानी झोडल्यावर शिष्टमंडळानें आभारपूर्वक शिवाचा निरोप घेतला

दुसऱ्या दिवशी शिष्टमंडळ गोविंदाच्या मुलाखतीला गेले, गोविंदा या वेळी सट्ट्याचे बेटिंग घेऊन बसला होता शिष्टमंडळातल्या प्रत्येक सभासदाने पंजावर एक एक पावली लावली

गोविंदा म्हणाला, 'पाटीलबुवा काल तुम्ही त्या हरामखोर शिवाच्या भेटीला गेला होता म्हणें! सांगा, किती कोंबड्या आणि किती बाटल्या दिल्या त्यानं तुम्हाला?'

'सगळ्यांना मिळून एकदर चार कोंबड्या आणि दहा बाटल्या!'

'मग माझ्या आठ कोंबड्या आणि वीस बाटल्या! अहो, माझ्यापुढें त्या शिवाची काय पाड!'

गोविंदाने ताबडतोब वीस बाटल्या शिष्टमंडळासमोर ठेवल्या आणि आठ कोंबड्याची ऑर्डर दिली

गोविंदाच्या पाहुणचारानं शिष्टमंडळ गार झाले मुख्य मुद्याकडे वळ-ण्याची कोणालाच आठवण होईना

बऱ्याच वेळाने आपण कशासाठी आलो आहोत याची अध्यक्षांना आठवण झाली ते म्हणाले, 'गोविंदा, आम्ही गाववाले तुमच्याकडे येण्याचे कारण हे कीं त्या हरामखोर शिवाबरोबर 'तुमचा समेट व्हावा'

'शिवाचं नाव काढू नका! तो पाजी माणस माझ्यासमोर काय टिकणार? त्यानं तुम्हाला दहा बाटल्या दिल्या तर मी वीस दिल्या! सांगा कोण मोठा?'

'तुम्हीच' नाही कोण म्हणतो? आमची नम्र विनंति आहे आपुर्ले तुमच्यात बखेडा नको विश्वशांतीच्या प्रयत्नास तुम्ही दोघांनीं हातभार लावावा अशी आमची मागणी आहे'

'मलाहि विश्वशान्तीची कळकळ आहे, पण समेट पाहिजे असेल तर त्या हरामखोर शिवानें माझी माफी मागितली पाहिजे!' गोविंदा म्हणाला.

'तुमची अट आम्ही मान्य करतों, पण आमच्या काही अटी तुम्ही ऐकल्या पाहिजेत'

'बोला! कोणत्या अटी आहेत तुमच्या?'

शिष्टमंडळातील बेकार वकील पुढें येऊन म्हणाले, 'तुमच्या दोन हातभट्ट्यापैकीं एक भट्टी बंद करा आणि दोन बायकापैकी एक बायको टाकून द्या! म्हणजे शिवा आणि तुम्ही याच्यामध्यें जी विषमता आणि वर्गकलह आहे तो दूर होईल!'

गोविंदा विचारात पडला. 'अतिशय गंभीर अशा या अटी आहेत! पण हातभट्टीचा एक अड्डा बंद करून उत्पादनाचे नुकसान करण्यास मी तयार नाहीं!' त्याने आपली अडचण सांगितली.

'अड्डा बंद करू नका. आम्हाला चालवायला द्या. या शिष्टमंडळाच्या तो स्वाधीन करा फक्त तो तुमच्याजवळ असू नये; हाच मुद्दा आहे.' वकिलानें खुलासा केला.

गोविंदाला ही अट मान्य झाली. हातभट्टीच्या दोन अड्ड्यापैकीं एक अड्डा शिष्टमंडळाला चालवायला देण्यास तो तयार झाला. पण दुसऱ्या अटीबद्दल त्याला पुन्हा शंका आली.

'माझ्या दोन बायकापैकीं एक बायको मी टाकून दिली तर तिचा संभाळ कोण करील?' गोविंदानें सवाल केला.

शिष्टमंडळाचे अध्यक्ष ताडकन् उठून म्हणाले, 'गोविंदा, तुम्हीं काळजी करू नका हें शिष्टमंडळ तुमच्या बायकोचा सांभाळ करील! तुम्हीं एक बायको शिष्टमंडळाचे स्वाधीन करा.

गोविंदाला हें आश्वासन मिळताच तो कबूल झाला. त्याला एक लग्नाची व एक बिनलग्नाची अशा दोन बायका होत्या. त्यापैकीं बिनलग्नाची बायको त्यानें शिष्टमंडळाला देऊन टाकली.

वाटाघाटी यशस्वी झाल्या. सगळ्या वाटल्या आणि वाटाघाट्या संपल्यावर गोविंदाचे आभार मानून शिष्टमंडळ परत गेलें.

पुढें शिवा आणि गोविंदा याच्यात कितपत समेट झाला तें माहीत नाही. पण शिष्टमंडळाला एक अड्डा आणि एक बाई मिळाली, ही फलश्रुति काही कमी नाहीं !